

नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com




# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# दीपावली



सप्टेंबर १९६८

वर्ष २४ वे

मूल्य १॥ रु.

## श्रे य ना मा व ली —

बंगाल आणि बंगाली माणूस यांची **दादूमिया** यांनी परखड शब्दात करून दिलेली ओळख ० **याला जीवन ऐसे नाव**... युद्धकाळातील खास आठवणी–**ब्रिगे. निजानंद बाळ** ० **स्त्रिश्चरित्रम्** ...... एका प्रौढेची रहस्यमय कथा आणि व्यथा—**प्रभाकर अत्रे** ० **जन्म** .... त्या प्रौढेपायीच त्याला मार बसला नि त्याला वाचविण्यासाठी तीच मध्ये पडली–**वा. रा. सोनार** ० **प्रभुदेव सरदार** .... संगीताची अखंड तपश्चर्या करणाऱ्या कायदेपंडिताचा **दा. गो. देशपांडे** यांनी करून दिलेला परिचय ० **सकाळी उठोनी नळासी भजावे** .... मुंबईकरांच्या जीवनातले रोजचे दृश्य— **ग. वि. साळवी** ० **अनारकली** ....'अनारकली'ची 'अनाजकली' करण्याची एक धडपड–सौ० **अंजली ठकार** ० **मरण दार ठोठावत आहे**.... थोरल्या माधवरावांच्या जीवनातील एका प्रसंगावरील एकांकिका— **प्र. ना. शेणई** ० **युद्ध : साडी नि परॉकचं**.... हेर म्हणून बंडू चितळेला पकडलं पण .... **वसंत देशमुख** शिवाय **इंद्रधनुष्य** .... 'हा खेळ सावल्यांचा' नाटकावर **ज्ञानेश्वर नाडकर्णी** यांचे समीक्षण, सन्मानपुष्पे, दीपमाला आणि

## ★ मासिक व्यंगचित्रमाला ★

**दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

* संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१ खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४. येथे छापले. या प्रतीस किंमत १॥ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही वाचकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. 

Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4.



अनुक्रमणिका

# आम्हा लाभु दे ताठ कणा —

१५ ऑगस्ट १९६९ ला हृया देशाचा २१ वा स्वातंत्र्यदिन मोठ्या थाटात साजरा झाला (असे म्हणण्याची वृत्तपत्रीय ( व सरकारी) पद्धत आहे म्हणून हे म्हटले नाही.तर थाटात झाला. ठिकठिकाणी ध्वज उभारले गेले संचलनं झाली. सभा–भाषणं झाली. त्यात मुख्यतः मंत्र्यांची भाषणं झाली. दिल्लीच्या लाल किल्ल्यावर नेहमी प्रमाणेच शाही इतमामाने एक कार्यक्रम पार पडला. वृत्तपत्रे संपावर असल्याने "आँखों देखा हाल" वर समाधान मानावे लागले. पंतप्रधानांनी भाषण करण्याची परंपरा पंडितजीपासून इंदिराजीपर्यंत अविरतपणे चालू आहे. त्या भाषणात त्यांनी कष्ट, हाल सोसून जीवन कंठणाऱ्या जनतेचा गौरव केला आहे भारत–पाक संबंधाबद्दल विवेचन केले आहे. शेवटी 'युद्ध नको' कराराबद्दल आवाहन केले आहे. कुणाला? – पाकिस्तानला ! ' हे आपल्या दोघांच्या अंतिम हिताचे आहे.' " हे भांडण दोन भावांच्या भांडणासारखे आहे " असंही त्या म्हणाल्या. हे आवाहन केले हृयात तसे नवीन काही नाही. त्यांनी सांगितले त्याप्रमाणे पंडितजी–शास्त्रीजींनीही तेच केले. एकीकडे हे आवाहन केले गेले. सादिक साहेब म्हणाले जगातली कोणतीही शक्ति भारत-काश्मीरचे ऐक्य तोडू शकणार नाही. संरक्षण मंत्री म्हणाले, ' कोठल्याही परकीय आक्रमणाचा मुकाबला भारतीय सेना व जनता करील. इंच इंच भूमीसाठी ती लढेल." हे खरे ठरायचे असेल तर आमच्या राजकीय नेतृत्वाला ताठ कणा लाभण्याची गरज आहे. सैनिक प्राणपणाने लढून जे यश व जी कीर्ति संपादन करतात तिला भडाग्नि देण्याचे काम कणाशून्य राजकीय नेतृत्व करीत आलेले आहे. काश्मीरच्या पहिल्या लढाईपासूनचा हा इतिहास आहे. तिबेट, नेफा, लडाख, काश्मीरमध्ये पुन्हा पुन्हा तेंच घडत आले आहे. ताश्कंद करारानं मोक्याची ठाणी सोडावी लागली. आणि आता त्यातूनच सशस्त्र पाकिस्तानी काश्मिरात पुन्हा घुसल्याच्या वार्ता आहेत. पाकचे धोरण त्यानी लपविले नाही. अयूब अर्शाद आणि कंपनीने शस्त्रे लपविली नाहीत. विखारी शब्दही बदलले नाहीत, दोन युद्धंही लादली. मिसऱ्याची सिद्धता पूर्ण करण्यासाठी मॉस्को-पेकिंग वाऱ्या झाल्या. मध्यपूर्वेचे दौरे झाले. सर्वदूरून शस्त्रास्त्रे आली. खुद्द रशियानेही शस्त्रे दिली 'संरक्षक शस्त्रे' दिली म्हणे. आता 'ही आक्रमक, ही संरक्षक, ही चीन विरोधी – ही भारतविरोधी अशी लेबले शस्त्रांवर असतात असे आपण समजायचे ! आणि रशियन शस्त्रास्त्रांविरुद्धची भारताची तीव्र प्रतिक्रिया कणाशून्य दिल्लीनें फक्त हात (मायनस कणा) असलेल्या बहुसंख्येच्या जीवावर पराभूत करायची ! कुणालाही शत्रू करायचे नाही असे म्हणत म्हणत व गावोगावी, गल्लोगल्ली वकिलातींचे पांढरे हत्ती पोशीत पोशीत आम्ही भोवती जो कांही गोतावळा उभा केला आहे त्यात आम्हाला एकही मित्र नाही ! चिमुरडा झेकोस्लोव्हाकिया बलाढ्य रशियाला चर्चेसाठी 'प्राग' ला यायला लावतो. आणि आम्ही ' नाही हो नाही ! रशियाच्या मनात तसले काही पाप नाही हो !' असा गळा काढून आमच्याच नाथ पै-वाजपेयींचे आवाज बंद करतो. पाकिस्तानची युद्धखोरी व तिची युद्ध सिद्धता सरळ सरळ समोर दिसत असताना "युद्ध नको" चे एकदा मनावर घ्या ना गडे असे कणाशून्य व राष्ट्राच्या अस्मितेचा अवमान करणारे आवाहन स्वातंत्र्यदिनी तरी निदान करण्याची पंतप्रधानांना काय गरज होती ? चाळीस कोटी माणसांचे हे राष्ट्र आहे. मुर्दाडांचे, नपुसकांचे, कर्मशून्य, पराक्रमशून्य, अस्मिताशून्य व्यक्तींचे हे राष्ट्र संरक्षणमंत्री "इंच इंच भूमीसाठी भारतीय लढतील असं म्हणतात-आणि चाळीस कोटींचा पंतप्रधान मात्र "तेवढे जरा बघा. मनावर घ्या" असे लाचार आवाहन करतो हे आम्हास पटत नाही. राष्ट्र सतत कुणाच्या तरी उपकारावर दीर्घकाल जगू शकत नाही. आज रशियाच्या, उद्या पाकच्या, परवा अमेरिकेच्या कृपाकटाक्षांची वाट पहात आपण जगलो तर 'काळ' आपलाच 'काळ' ठरेल ही दगडावरची रेघ आहे. अखेर आपण ताठ कणा धारण केलाच पाहिजे. 'अॅट द मर्सी ऑफ' जगणे सोडून दिले पाहिजे. आपली शक्ति अखेर ऐंशी कोटी हातात आहे हृयाचा साक्षात्कार आधी लोकनेत्यांनी करून घेतला पाहिजे. तरच ते जनमानसात तो घडवू शकतील, प्रत्येकजण अखेर 'आत्मन्' ओळखल्याशिवाय 'मोक्ष' मिळत नाही. राष्ट्रीय मोक्षासाठी सुद्धा आपली स्वतःची ठाम ओळख पटवून घेतली पाहिजे. ती घेतली तर असली अस्मिताशून्य, कणाशून्य व वांझोटी आवाहनें करण्याचे "प्रसंग" पंतप्रधानांच्या मुखाने राष्ट्रावर येणार नाहीत. ते येणार नाहीत तोच खरा सुदिन ! खरा स्वातंत्र्यदिन !! एकवीस वर्षानंतर तरी आता तरुणाचा ताठ कणा ( व बाणा ) आम्हाला लाभायला नको काय ?

–संपादक





**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :

३५७७६५ DALALART

° **वर्गणीदारांस सूचना** : दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६**

° **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

° **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

° **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

° **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

° **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यानी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१ खेतवाडी मेनरोड मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.

**—दादूमीया**




**बंगाल हा भारताचाच भाग; पण स्वातंत्र्य पत्करताना त्याची फाळणी उघड्या डोळ्यानी पहावी लागली नि पचवावी लागली. नुक्ताच आपण १५ ऑगस्टचा एकविसावा स्वातंत्र्यदिन साजरा केला; तथापि खऱ्याखुऱ्या बंगाली मनाची ओळख भारतीयाना अद्यापि झाली आहे काय ?**

**तसे** पाहिले तर बंगाल इतर प्रांतांच्या मानाने दुर्भागीच. ज्याने यावे त्याने फटकारावे. गंगेच्या पाण्यामुळे व सुपीक जमिनीमुळे बंगालला "जगातील तांदुळाचा द्रोण" म्हणतात. इथे सारेच मुबलक. आळस तर सर्वात मुबलक. म्हणून की काय, पारतंत्र्याची बेडी बंगालच्या पायांत फार प्राचीन काळापासून अडकली आहे. मुसलमान जमीनदारानी अगदी पिळून काढले बंगाली हिंदु कुळास ! तरीही हा बेटा शांतच. काली मातेचा हा पुजारी सारा बंगाली इस्लामी आक्रमणाखाली पिचून निघाला तरी शांत शांतच.

मुसलमानांकडून सत्ता इंग्रजानी हिसकावून घेतली. मुसलमानांचा त्यात मानभंग होणे साहजिकच आहे. जमिनी काढून घेतल्या. सत्ता केली, पैसा—अडकाही इंग्रजानी जप्त केला. पण तेवढेच दुःख हिंदूनाही होणे स्वाभाविक होते. हिंदू लोक तेथील कामगार. त्यांच्या पोटावर या पांढऱ्या साहेबाने चक्क नांगर फिरविला. चार दोन हिंदू स्वामिनिष्ठांना साहेबाने "जमीनदार" बनविले खरे पण बहुजनसमाजाची स्थिती विकटच होती.

ईस्ट इंडिया कंपनी ही साहेबाने इंग्लंडची तिजोरी भरण्यासाठी स्थापन केलेली कंपनी. फ्रेंच व डच लोकांवर मात करून इंग्रजाने कलकत्ता ही आपली राजधानी बनविली. क्लाईव्हच्या वेळेस मुर्शिदाबाद ही राजधानी होती. लंडनप्रमाणे मुर्शिदाबाद मोठे भव्य व श्रीमंत नगर होते असे क्लाईव्हने १७५७ साली नमूद करून ठेवले आहे, पण ह्या साऱ्या श्रीमंतीचे दारिद्र्यांत रूपांतर करण्याचे श्रेय—अन् तेही अवघ्या तीन दशकात—कंपनी सरकारच्या अधिकाऱ्यांकडे जाते.

विल्यम फुलर्टन या कंपनी सरकारच्या अधिकाऱ्यानेच लिहून ठेवले आहे. " बंगाल पूर्वी धान्याचे कोठार होते. व्यापार, संपत्ती, व उद्योग यांचे पूर्वेकडील केंद्र म्हणजे बंगाल. पण आमच्या सरकारचे चाळे मोठे जबरदस्त ! वीस वर्षांच्या आत या बंगालचे अक्षरशः एका रणात रुपांतर झाले ! शेतीची नासाडी झाली. सर्वत्र उदंड रान माजले. उद्योगपतींचा तर कंपनीने छळ चालविला आहे. बंगालच्या व्यापाऱ्यांचे हाल आहेत. सर्वत्र दुष्काळाची चिन्हे दिसून येत आहेत. लोक येथून पळतील नाही तर काय ?"

एडमंड बर्कने हेस्टिंग्जविरुद्ध इंग्लंडच्या लोकसभेत मोठा गहजब उडवून दिला. या हेस्टिंग्जनेच बंगालचा वटचाबोळ केला. बर्कने लोकसभेत सांगितले: " बंगालमध्ये कोणती हलाखीची स्थिती आहे हे मी कसे सांगू ? तेथे गुरे व इतर पशू पाव किमतीस विकली जात आहेत. तेथे लोकांच्या झोपडचांना आगी लावल्या जात आहेत. पूर्वीचे मालक व उद्योगपती आज भिकारी बनले आहेत ! आज ते लाचार झाले आहेत. पैसे उधार मागीत फिरत आहेत आणि व्याजाचा दर काय ? वीस, तीस, चाळीस, पन्नास—छेः छेः, सहाशे टक्के व्याज !" बर्कचे म्हणणे अगदी खरे होते. लोक स्वतःची पोरे " स्वस्तात " विकून टाकीत असत ! हजारो खेडुत आपापली खेडी सोडून पळून जाऊ लागले—त्यावर गोऱ्या पलटणींचे पहारे बसले. पळून जाणे पाप ठरले, गुन्हा ठरला.









अनुक्रमणिका

भारतास स्वामी विवेकानंदानी शिकविला– धार्मिक प्रवचनांमधून ! बंगाली क्रांतिकारकांच्या तोंडी "वंदे मातरम्" व हातात विवेकानंदांचे साहित्य सापडे. "मर्द बनो !" हा महान् संदेश विवेकानंदानी आपल्या देशबांधवांना दिला.

**कॉंग्रेसचे मूल्यमापन**

भारतीय कॉंग्रेस १८८५ साली मुंबईत स्थापिली गेली–त्यापुढील बैठक कलकत्ता येथे झाली. त्यानंतर कॉंग्रेस म्हणजे " बंगाली राजकीय कल्पना पसरविण्यासाठी स्थापन झालेली संस्था" असा सर्वत्र समज झाला. आणि बंगाली राजकीय कल्पना म्हणजे हिंदू राष्ट्रवाद. त्याने सर सैय्यद अहमद साहेब खरोखर चवताळून उठले. तिसऱ्या वार्षिक समारंभाच्या वेळी सरसाहेब मद्रास येथे म्हणाले, " If you accept that the country should grow under the yolk of Bengali rule and its people like the Bengali shoes, then in the name of God ; Jump into the train, sit down and be off to Madras."

मद्रास येथे त्यावेळेस कॉंग्रसचे अधिवेशन होते हे लक्षात ठेवले की सैय्यद साहेबांचा घुस्सा कां व कोणावर होता हे चटकन् कळून येईल. ब्रिटिशांचा घुस्सा तर बंगाल्यांवर होताच होता. मालेसनने १८५७-वर सुंदर ग्रंथ लिहीला आहे. सावरकरांच्या स्वातंत्र्यसमरांत मालेसनची वचने मुक्तपणे विखुरलेली आढळतात. हा मालेसन कॉंग्रेसला, 'Noisy and cowardly.' बंगाल्यानी सुरू केलेली संस्था" असे म्हणतो व " Not countenanced by the real people of India." असे बजावतो.

कॉंग्रेसमध्ये हळू हळू अँग्लोइंडियन्स्, पार्शी वगैरे लोकांचे प्राबल्य वाढू लागले. हे लोक बंगाली बाबूना त्यांची मते का मांडून देणार होते ? २८ ऑगस्ट १८९३ रोजीं मुंबईच्या "इंदु प्रकाश" या पत्रात अरविंदबाबूनी चिडून लिहिले :
" In an era when democracy and similar big words slide so glibly from our tongues, a body like the Congress, which represents not the man of population, but a single and very limited class, could not honestly be called national." पुढे ते म्हणतात "....the methods of has chosen are not the right methods, and the leaders in whom it trusts, not the right sort of men to be leaders—— in brief, that we are at present the blind led, if not by the blind, at any rate by the one-eyed." इंदु–प्रकाशाच्या संपादकांवर "सनदशीर" मार्गाने जाणाऱ्या रानडयांनी दडपण आणले व अरविंद बाबूंचा लेख प्रसिद्ध होऊ दिला नाही. पुण्यात लोकमान्यही असेच संतापून कॉंग्रेसमधील मवाळाना शिव्या मोजीत हे नमूद करण्यासारखे आहे.

लाल, बाल व पाल ही त्रिकुटी भारतीय राजकारणात त्यावेळेस एकदम पुढे आली. "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व तो मी मिळविणारच," अशी घोषणा लो. टिळकानी केली. लालाजींचे व टिळकांचे आशीर्वाद मराठी, पंजाबी व बंगाली क्रांतिकारकांना लाभले होते. हे तिन्ही वीर सुदैवाने ' सेक्युलर' नव्हते. " खटासी असावे खटनट" या तत्त्वज्ञानावर तिघांची श्रद्धा होती व म्हणूनच टिळकयुगात जीना टिळकांच्या बाजूने होते. पुढे दांभिक सेक्यलरवाद कॉंग्रेसमध्ये शिरला व जीनाजी कॉंग्रेसमधून बाहेर पडले. बंगालमध्ये हा हिंदू राष्ट्रवाद समर्थ केला दोन महान् पुढाऱ्यांनी. ते म्हणजे पाल व अरविंद घोष. अरविंदबाबू म्हणत, "राष्ट्रवाद हा धर्म आहे. ते परमपवित्र कर्तव्य आहे. राष्ट्रवादाच्या बळावर आम्ही त्रिभुवनही जिंकू !" या जहाल लोकात पुढे मोतीलाल नेहरू सामील झाले. त्यांचे सारे दोस्त इंग्रज अधिकारी असत. त्या दोस्तीच्या "मेहेरबानी"वर त्यांची वकिली चाले. बंगाली व मराठी पुढाऱ्याना त्यांचे जहालपण संशयास्पदच वाटे. जालीयनवाला बाग प्रकरणानंतर मात्र त्यांची मते खरोखरच जहाल झाली.

मवाळांविषयी काय लिहावे ? त्यांचे अध्वर्यू गोखलेसाहेब. टिळकांच्याच जातीचे व वयाचे; पण साहेबाच्या मर्जीवर अवलंबून राहणारे. त्यांना साहेबाने फेकलेले चार दोन तुकडे पाहिजे होते. साहेब हा देव हीच त्यांची समजूत " Only mad men outside lunatic asylum could think or talk of indifference. There is no alternative to British rule, any attempts to disturb it, directly or indirectly, are bound to recoil on our heads." ही झाली गोखल्यांची मुक्ताफळे. मेथासाहेब काय किंवा इतर मवाळ काय — ते तर ह्या हूनही जादा ! अरविंदबाबू व त्यांच्या इतर बंगाली मित्राना हा बावळटपणा कसा रुचेल ? अरविंदबाबूनी ठणकावून बजावले : " Political freedom is the life-breath of a nation ; to attempt social reform, educational reform, industrial expansion, the moral improvement of the race without aiming first and foremost at political freedom is the very height of ignorance and futility."











थॉमस मन्रो हाही इंग्रजच. हाउस ऑफ कॉमन्समध्ये ह्या साहेबाचे मोठे प्रक्षोभक वक्तव्य झाले. साहेबाने सांगितले, " बंगालच्या कारागीरांची बोटे जादूची आहेत. त्यांच्या हाताएवढे कसब दुनियेत कोठेही मिळणार नाही. इथल्याएवढा उदारपणा व आदरातिथ्य कोठेही दिसणार नाही. संस्कृतीच्या दृष्टीतून बोलायचे तर इंग्लंड व पूर्व भारत यांच्यामध्ये भारत श्रेष्ठ आहे. माझी तशी खात्री होऊन चुकली आहे."

या बंगाली उद्योगधंद्यास एवढी उतरती कळा कशी आली ? कंपनी सरकारने ठरविले, या कारागीरांचा माल फक्त सरकारच विकत घेईल. किमत कोणती ? सरकार ठरवून देईल ती. इंग्रजांच्या हाती राजकीय व सैनिकी सत्ता होती. साहजिकच त्यांचा शब्द कायदा ठरला. बंगाली कोष्ठी उपाशी राहू लागले. तरीही त्यांची मलमल श्रेष्ठ प्रतीची उपजे. आली का पंचाईत ? इंग्रज उद्योगपती तडफडू लागले. त्यांना खूष करण्यासाठी बंगाली कारागीरांचे अंगठे, सफाचट करण्यात आले. १८३४–३५ साली गव्हर्नर जनरलसाहेबाने नमूद करून ठेवले आहे : " The misery hardly finds a parallel in the history of commerce. The bones of the cotton-weavers are bleaching the plains of India."

काय नशिब असते एकेका प्रांताचे ? बुद्धधर्मीयानी असाच धुमाकूळ घातला. म्हणून मुसलमानाना "आमंत्रण" दिले गेले. त्यानी हिंदू व बुद्धधर्मीय या दोघानाही लंबे केले ! पुढे मराठ्यानी हिंदू व मुसलमान यांना छळून छळून काढले. अजूनही पोर झोपत नसले तर बंगालमध्ये " मराठो आव्यो " म्हणून आई ओरडते. साहेब मात्र "उस्से भी जादा" ठरला.

राजा राममोहन रॉय हे हिंदूंचे सैयद अहंमद. इंग्रजी शिकून आपल्या जमातीचे भले होईल ही आशा उराशी बाळगणारे हिंदुधर्मीयांमध्ये भेद फार, पंथ फार. म्हणून ते मागे पडले. त्यानी जर संघटीत राहण्याचा प्रयत्न केला तर त्यांचे भविष्य उज्ज्वल होईल ही त्यांची भावना. म्हणून त्यानी आधीच नाना पंथ असलेल्या हिंदु धर्मात एक नव्या पंथाची भर टाकली. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचा पंथ व विचार सारेच नामशेष झाले. कारण त्यात तसा दम नव्हता. प्रार्थनेसाठी एकत्र यावे, संघटित रहावे ही कळकळ बरोबर आहे. पण त्यासाठी मंदिराचे चर्च कशाला बनवावयास पाहिजे ? साहेब रविवारी सकाळी चर्चमध्ये जातो. म्हणून तुम्हीही त्याच दिवशी सकाळी जमा—हा आग्रह, नव्हे दुराग्रह — कशाला ?

ह्या हिंदू रेव्हरंड लोकांचे पीक जसे एकदम आले तसे एकदम गेलेही पण.

१८५७ साली बंगालमध्ये राजकीय पोकळी होती. बंगालने ह्या स्वातंत्र्ययुद्धात भाग घेतला नाही हे सत्य आहे. ज्यात बंगाल सहभागी नाही ते राष्ट्रीय नाही, असा दुर्दैवाने "बंगालचा दावा" आहे. नक्षलबारी राष्ट्रीय असंतोषाची चळवळ म्हणून सिद्ध होते. भारतीय स्वातंत्र्ययुद्ध बंगाली नाही. म्हणून बंगाली इतिहासकारांच्या मतें ती फक्त शिपायांची भाऊगर्दी ! आमच्या मऱ्हाठी विद्वानाना त्यासाठी मुद्दे या बंगाली "राष्ट्रीय" इतिहासकारानीच पुरविले. या राजकीय पोकळीच्या काळात छोटे छोटे जमीनदार श्रेष्ठ बनून हिंदू मुसलमान कुळाना छळीत होते व इंग्रजांशी सूत जमवून आपला लग्गा साधीत होते. कम्युनिस्टांच्या भाषेत यांची जात एकच. संधिसाधू बूर्झ्वा !

राज नारायण बोस हे नाव बंगाली लोक विसरले असले तरी आपण विसरता कामा नये. बंगाली माणूस कमालीचा विसराळू. सुभाष बोसना जो विसरला तेथे राज नारायण बोसांची काय कथा ? हे बोस बाबू अरविंद घोषांचे आजोबा —आईचे वडील. हिंदुत्व कसे श्रेष्ठ आहे, हिंदूंचे राष्ट्र म्हणजेच भारत वगैरे विषयांवर या बोसबाबूंनी व्याख्याने ठोकण्याचा आरंभ केला. ख्रिस्ती पाद्र्यांचा तर त्यांनी धुव्वा उडविला ! "सोनार बांगला"ची घोषणा सर्वप्रथम राजनारायण बाबूंनी केली. नाभा गोपाल मित्र हे त्यांचे पट्टशिष्य–हिंदुराष्ट्रावर भर देणारे व राष्ट्रीयत्वाचा प्रचार करणारे "राष्ट्रीय पत्रक" हे वर्तमानपत्र ह्या पठ्ठ्याने १८६७ साली चालविले! सुरेंद्रनाथ बानर्जी, बंकीमचंद्र चतर्जी, बिपीन चंद्र पाल या सर्वांना स्फूर्ती या हिंदू वीराने दिली. भारताचे पहिले हेडगेवार राजनारायण बोसबाबू व पहिले सावरकर नाभा गोपाल मित्र हे सत्य निदान हिंदु राष्ट्रवादी लोकाना ठाऊक असावयास पाहिजे.

इंग्रजी ज्ञानाचा प्रसार साहजिकच बंगालमध्ये सर्वप्रथम झाला. मॅझिनीपासून स्फूर्ती घेऊन सुरेंद्रनाथ बानर्जींनी "इंडियन ॲसोसिएशन" नावाचा राजकीय पक्ष स्थापला. संयुक्त भारत व हिंदु-मुस्लीम मैत्री यावर बानर्जीबाबूंचा भर होता. १८७७ साली बानर्जी बाबूंनी भारताचा दौरा काढला. लगेच हेन्री कॉटनने १८७८ साली आपल्या आठवणीत लिहून ठेवल. " The Bengali Babus now rule public opinion from Peshawar to Chittagong."

बंगालमध्ये सर्वप्रथम हिंदू राष्ट्रवादाचा उदय झाला हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. महाराष्ट्रात निदान तसे होण्यास ऐतिहासिक पार्श्वभूमी तरी तयार होती. संतांची शिकवणूक, शिवाजी राजे, त्यांचे वंशज व पुढे पेशवे यांचे राज्य महाराष्ट्रात असल्याकारणाने मऱ्हाठी मनात हिंदुपदपातशाही रुजलेली होती. बंगालमध्ये तसे होण्यास कोणची कारणे घडली ?

एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या तीन दशकात बंगालमध्ये वृत्तपत्रे, नाटके, कविता, कादंबऱ्या, गाणी, पोवाडे—या साऱ्यानी राष्ट्रीयत्वावर मुख्यतः भर दिला. आनंदमठ या कादंबरीतील बंकीमबाबूंचे अमर गीत "वंदे मातरम्" या देशात कोण विसरू शकेल ? स्वामी विवेकानंदानी अमेरिकेच्या धर्मसभेत परदेशीयांची मने जिंकून हिंदुत्वाचे श्रेष्ठत्व त्यांच्या गळी उतरविले. त्यानंतर काश्मीरपासून केपकामोरीनपर्यंत विवेकानंदांच्या ग्रंथांची सर्वत्र पारायणे होऊ लागली, "उत्तिष्ठ, जागृत !" हा संदेश लाखो हिंदू लोकाना जागृत करू लागला. भारतीय समाजवादाचा पहिला झेंडा








### इंग्रजांची क्रूर दडपशाही

क्रांतिकारक भक्त व जहाल पुढारी हे महायुद्धाचा मोका साधून धमाल उडवितील हे चाणाक्ष साहेबाने तावडतोब जाणले. म्हणून साहेबाने दमनाची नीती अवलंबिली. बंगालच्या कोवळ्या क्रांतिकारकांना अतिशय क्रौर्याने इंग्रज सरकारने दडपून टाकण्याचा चंग बांधला. बंगालची फाळणी फक्त या जहाल क्रांतिकारकांपुढे रद्द करावी लागली हे सत्य सरकारच्या intelligence खात्याला ठाऊक का नव्हते? यापुढील प्रसंग बंगालच्या दुर्दैवाने बंगाली माणसास मोठे कटु गेले. बंगालला टिळकांचा फार मोठा आधार होता. टिळकांना सरकारने तुरुंगात डांबताच बंगाल जवळजवळ लुळा पडला. अरविंदबाबू मुंबईस वा कलकत्त्यास स्थायिक व्हायचे सोडून संन्याशाची भगवी वस्त्रे पेहरून पाँडिचरीस रवाना झाले. "वंदे मातरम्"चा नुसता आवाज आला तरी बंगालमध्ये धरपकड होई एवढी बंगाली क्रांतिकारकांची दहशत साहेबाने घेतली होती. मवाळ लोकांना मात्र अस्मान ठेंगणे वाटू लागले. काँग्रेस त्यांची मिरासदारी झाली. सुरतेस मवाळांचा पराजय झाला होता. त्यानंतर सुमारे एक दशक मवाळ लोक मायबाप दयाळू सरकारच्या कृपेने स्वर्गानंदात होते. टिळक १९१४ साली सुटले व मवाळांची सद्दी संपली. १९१६ साली टिळकांनी काँग्रेसमध्ये प्रवेश केला. आदल्याच वर्षी मेथा व गोखले मरण पावले होते. टिळकांचा काँग्रेसमध्ये प्रवेश म्हणजे मवाळाना व इंग्रज सरकारला धडकीच भरली. इंग्रज सरकारने १९१८ साली मॉंटेग्यु सुधारणेचे गाजर भारतीयांच्या नाकासमोर नाचविले.

बंगाल व महाराष्ट्र यांच्यासाठी फार चांगले ग्रह आता आले होते. मवाळाना जवळजवळ ग्रहणच लागले होते. १९१८ नंतर मवाळांचा जमाना संपला अशीच चिन्हे दिसू लागली. सरकार दबून हळूहळू सुधारणा जहालांच्या झोळीत टाकणार अशी "हवा" निर्माण झाली. इंग्रज सरकारला एवढे कळून चुकले की बंगाल हा एक महाभयंकर बाँब आहे. वेळीच जर सावरले नाही तर भडका तमाम देशभर पसरून साहेब त्यात भाजून मरेल फुकट! सरकारने मुस्लीम लीगला खतपाणी घालून वाढविण्याचे प्रयत्न सुरू केले. बंगालमध्ये सुरुवातीला इंग्रजांचे तेही प्रयत्न फसले. बंगाल पुनश्च एक झाला हे पाहून साहेब खरोखरीच हात चोळू लागला. एवढ्यात १९२० साली लो. टिळक मधुमेहाने गेले व भारताचे ग्रह एकदम फिरले. बंगाल अत्यंत दुःखी झाला.

गांधीयुगात बंगाल्यांचा व गांधी भक्तांचा सूर कधी जमलाच नाही. बंगाली बाबूंनी नाईलाजाने गांधीजींच्या काँग्रेसमध्ये काम केले पण त्यांचे हृदय कधीच काँग्रेसमध्ये नव्हते. गांधीजी व बंगाल किंवा नेहरू व बंगाल कधी हातात हात घालून पुढे जाऊच शकले नाहीत.

विपीनचंद्र पालबाबूंनी त्यावेळेस लिहून ठेवले –

"Mr. Gandhi has not been helped to his unique influence in the country by merely the medieval Indian mind, but also by the mere practical support that has come to him from the multi-millionaires and the mill-masters of his arm province who have not been slow to recognise in him a very efficient instrument for advancing their own economic and financial interests. They have exploited him as he himself has, perhaps unconsciously, exploited them. In the coming Gandhi Raj, if the Gandhi Movement succeeds, we shall have no democracy but an autocracy of the oriental type dominated by priestly influences and worked especially for the benefit of profiteering banias."

महाराष्ट्र व बंगाल यांचा पिंड त्यागमय. संपत्तीची लालसा तेथे कमीच. "ज्ञानधन" व "मानधन" यांची तेथे चलती. गांधीवादी राजकारणात हे दोन्ही प्रांत दुःखी झाले. या प्रांतातील खऱ्या पुढाऱ्यांची सद्दी गांधीवादी राजकारणात संपुष्टात आली. महाराष्ट्राची व्यथा तीच नेमकी बंगालची व्यथा होती. विपीनबाबूंनी फार सुंदर शब्दांत ती व्यथा वर लिहिल्याप्रमाणे व्यक्त केली आहे.

### बंगालला अहिंसेचे वावडे

अहिंसा बंगालला कधी मानवलीच नाही. अगदी पहिल्या महायुद्धाच्या काळी रासविहारी बोसबाबूंनी जर्मन हत्यारे व दारुगोळा जमवून इंग्रजांच्या सत्तेला सुरुंग लावण्याची तयारी चालविली होती. ही त्यांची तयारी दुसऱ्या महायुद्धाच्या काळी सुभाषचंद्राना उपयोगी पडली. नरेंद्रनाथ भट्टाचार्य हा दुसरा क्रांतिकारक इंग्रजाना देशातून घालवून देण्यासाठी युरोपात स्थायिक झालेला. रशियात मोठा सन्मान मिळवून मायदेशी एम. एन. रॉय म्हणून परत फिरला. गांधीजीना "चालते मंदिर" (Walking Church) म्हणणारा. मंदिर एवढ्यासाठी की मंदिरातून निष्पत्ती काहीच नाही. या क्रांतिकारकांची अवस्था "चट्टो" वा लाला हरदयाळांप्रमाणेच झाली. गांधीजीनी यतीन दासला Dastard म्हटले! क्रांतिकारकाना "गुन्हेगारी मनोवृत्ती"चे ठरविले.

गांधीजीना आवाहन मात्र फक्त एकाच वीराने सुरुवातीला दिले. तो वीर म्हणजे चित्तरंजन दास. गांधीजींचे फोल शब्द व अतिशयोक्तीची आश्वासने त्याना चीड आणीत. त्याना "प्रत्यक्ष कार्य" पाहिजे होते. त्यांनी हिंदु-मुस्लीम ऐक्यासाठी, भारतीय स्वातंत्र्यासाठी कार्यक्रम सुचविले. पण गांधीजी जास्त हुषार होते. पक्ष संघटनेत वाकबगार होते. उत्तर प्रदेश व गुजरात हा नवीन Axis तयार करून त्यानी इतर प्रांतीयाना नामोहरम केले. खुद्द नेहरू व मौ. आझाद यानी कबूल केले आहे की दासबाबूंचा कार्यक्रम जास्त चांगला, जास्त फलदायी होता. दासबाबूंचा लौकर मृत्यू न होता तर गांधीजींच्या नेतृत्वास निश्चित् धोका होता. दासबाबूंच्या मार्गदर्शनाखाली "स्वराज्य पक्ष" जास्त सबळ झाला असता.

सुभाषचंद्र बोस हे गांधीजींचे प्रतिस्पर्धी. चित्तरंजन दासांचे ते खास पट्टशिष्य. गांधीजीना चिरडून टाकणारे सामर्थ्य काँग्रेसपक्षात फक्त सुभाषबाबूंजवळच होते. दासबाबूंच्या मृत्यूनंतर एका दशकातच सुभाषबाबूंनी गांधीजींची झोप उडविली. हे गांधीजीना फक्त त्यांची स्वतःचीच मते मान्य होती. त्यांना स्वतः पुरते मतस्वातंत्र्य मान्य होते,

[ पृष्ठ ५८ वर पहा ]





# याला जीवन ऐसे नांव

— ब्रिग्रे. निजानंद बाळ



**दापोली** हायस्कुलात मी पाऊल ठेवले. मात्र प्रिन्सिपॉल रेव्ह. गॅडनेचा सहाफुटी रुबाबदार बांधाच मला खाऊन गेला. त्याचा दरारा वाटू लागला. परंतु बाळांची दुसरी पिढी ( तीस वर्षानंतर ) शाळेत पाऊल टाकत्येय, या अनुभवाने गॅडनेच्या निळ्या डोळ्यात प्रसन्नतेची झाक चमकली. माझे वडीलही त्याच्याच तालमीत 'यॅस प्यॅस' शिकले होते ना ? गॅडनेने मला पहिल्यापासूनच सर्वतोपरी प्रोत्साहन दिल्याने माझा लहानपणींचा वांडपणा आपोआपच पुष्कळसा घटला व मी मन लावून अभ्यास करु लागलो. माझी प्रगती पाहून गॅडने खूष होत असे. परीक्षेत पहिल्या नंबरचे मार्क मिळाले की एकदम दोन इयत्ता वर जाण्याची संधीही त्यानेच दिली.

तसे पाहिले तर ह्रूड आणि तितकाच तापट म्हणूनच लहानपणी माझी ख्याती होती. त्याच्यामुळे लाडघरची शाळा सुटली. असे सांगतात की एकदा आमच्या पंतोजीवर मी इतका भडकलो होतो की, त्यांचीच खुर्ची त्यांच्या डोक्यात घालण्याची धमकी मी त्याना दिली होती. आणि माझ्या वडिलांपर्यंत "कारट्याची ती अवलक्षणे" साग्रसंगीत पोहोचल्यानंतर शाळा बदलण्याखेरीज ते तरी दुसरे काय करणार ?

मास्तर तर मास्तरच, प्रत्यक्ष आईलाही वाकविण्यास मी कमी केले नव्हते. झाले काय, की एकदा तिने मला अनेक कारणानी झोडपून काढले. घरगुती तापाचा सारा वचपा कोणावर तरी काढावयाचा ना ? म्हणून ती आपले हात मोकळे करून घेत होती. मी हूं की चूं न करता मार खात होतो. अखेर तीच थांबली. तेव्हा मी लगेच म्हटले, 'आता कां थांबलीस ? मी अजूनही सांगतो की, ज्या गोष्टीसाठी तू मला बडविलेस, ती मी केलेली नाही. माझा काहीही अपराध नसताना, तू मारतेस ना ? मग मार... खुशाल ...हवे तेवढे मार."

अखेर आईची बरसात थांबली. त्यानंतर मी घरातून बाहेर पडलो व काय वाट्टेल ते झाले, तरी घरात पुन्हा पाय ठेवायचा नाही, असा कृतनिश्चय केला. परंतु संध्याकाळ झाली. हळुहळू अंधार पसरू लागला. भुताखेतांच्या आठवणीने हातपाय लटलट कापू लागले नि मी मुकाट्याने घरात परतलो.

पहाटेची मस्त झोप सोडून म्हणे देवासाठी फुले वेचा ... कोणी सांगितला हा नसता उपद्व्याप ? त्यामुळे एकदा मामा भडकला. झाले, मामा रागावतो ना ? मग घरात पाऊलच टाकावयाचे नाही, असा ठाम... अगदी ध्रुवासारखा ...निश्चय केला. कारण ध्रुव–चिलियाची गोष्ट आम्हा बाल गोपालाना माहीत होती. आमच्या दृष्टीने त्यातला अर्थ इतकाच की हटून बसले की अखेर अखेर सर्व काही पदरात पडते ...दिवस बुडाला तरी माझा पत्ता नव्हता. अखेर आईने कुळवाड्यांकडून माझा पत्ता काढला व तिने दादाबाबा केल्यावरच मी मोठ्या ऐटीत पुन्हा घरात पाऊल टाकले.

आमचा सगळ्याचा आवडता उद्योग म्हणजे उनाड तट्टे व गाढवे पकडून त्यांचेवर मिरविणे. वडील तर शिस्तीचे कट्टर भोक्ते, आणि महातापट. कसे कोण जाणे, पण तो संताप माझ्या वाट्याला फारसा कधीच आलेला आठवत नाही.

त्याना एकच तळमळ होती, 'पोरानी शिकावे व नाव कमवावे ! रात्री कंद्या किंवा घासलेटची चिमणीसुद्धा लावली जात नसे. कारण तेलासाठी खर्च पडणारा पैसा मुलांचे शिक्षणासाठी अधिक कामी येतो ना ? स्वावलंबन, शिस्त व सुदृढतेचे पाथेय आम्हा सर्वानाच आयुष्यभर पुरले. ह्रूड म्हणून गाजलेल्या परंतु पुढे नाव कमाविणाऱ्या नातवाच्या मांडीवरच प्राण सोडण्याची आजीची इच्छा तिची ऐशी उलटल्यावर पूर्णपणे सफल व्हावी हाही एक विलक्षण योगायोगच.

दापोलीच्या शाळेत जाऊ लागल्यानंतर काही वर्षानी आणखी एक घटना घडली. माझे काका पांडुतात्या दापोलीस आले होते. त्यावेळी शिक्षकानी माझ्या हुशारीची वाखाणणी त्यांचेजवळ केली. तेव्हा तात्यानी मला लगेच आपल्याबरोबर पुण्यास नेले. 'ते स्वतः कट्टर टिळक भक्त होते. त्यामुळे तेथील चांगल्या सुसंस्कृत वातावरणाचा माझ्या बालबुद्धीवर चांगलाच ठसा उमटला.

पांडुतात्यानी मला १९२५ साली कानपूरला झालेल्या कॉंग्रेस अधिवेशनालाही नेले होते. त्यामुळे मनात अंकुरत असलेली राष्ट्रभक्ती अधिक जोपासली गेली. पांडुतात्या हे स्वा. सावरकरांचेही निःसिम भक्त होते. एकाच वाक्यात सांगावयाचे तर मी जे काही कमाविले, त्यात तात्यांचाच वाटा फार मोठा होता.

ब्राम्हणाचे आत्मतेज व क्षत्रियांचा बाणा हेच आपले तारक होत, हे तात्यानी माझे मनात पक्के बिंबविले होते. म. गांधी, डॉ. मुंजे, साहित्य सम्राट न. चिं. केळकर यांची व्याख्याने व भोपटकरांच्या भाल्याची फेक अनुभवून तीच शिदोरी घेऊन मी १९३० साली सँडहर्स्ट ( इंग्लंड ) च्या लष्करी अकादमीत जाण्यासाठी बोटीवर पाय ठेवला ... तीस डिसेंबर १९३०







अनुक्रमणिका

. . . माझे वय अवघे वर्षे वीस . . . आम्ही एकूण सुमारे दहा एक मुले त्या शिक्षणासाठी निवडलो गेलो होतो. तेथे पोहोचल्यानंतर रँग्लर र. पु. परांजपे यांचेशी सर्वांची ओळख करून देण्यात आली. ते त्यावेळच्या इंडिया कौन्सिलचे सदस्य होते. इंग्रजांबरोबर त्यांचेच प्रमाणे वागा. तुम्ही आणि ते सारखेच आहात. नसते लहान–मोठेपण मनात उभे करू नका, हे त्यानी तेथेच आम्हाला शिकविले.

सँडहर्स्टचा दीड वर्षांचा अभ्यासक्रम यशस्वीरीत्या पूर्ण केल्यानंतर १९३२ साली मला किंग्ज कमिशन मिळून मराठा इन्फंट्रीत माझी नेमणूक झाली. जीवन म्हणजे अपघात असे म्हणतात–आणि माझ्या बाबतीत तरी सदैव चांगलेच 'अपघात' जीवनात घडत आलेले आहेत. पंचवीस वर्षांच्या लष्करी नोकरीत असे कित्येक वेळा घडले, की रणांगणावर जाण्याची आज्ञा हातात पडली . . . मी अर्थातच काहीशा उत्सुकतेने, बऱ्याचशा साशंकतेने निघण्याची तयारी केली . . . निघालोही नि वाटेतच मध्येच कोठेतरी माझी कामगिरी अनपेक्षितपणे दुसऱ्याकडे सोंपविली गेली. त्यामुळे युद्धातून निर्माण होणारा विध्वंस पहाण्याचे माझ्या नशिबी आले नाही.

माझी पहिली नेमणूक झाली वायव्य सरहद्द प्रांतात. तेथील लोक बंदुकीचे चाप ओढण्यास केव्हाही निमित्तच शोधणारे. परंतु एकंदरीत पठाण सचोटीचा, दिलखुलास व सरळमार्गी असल्याचाच अनुभव आला. तो शत्रूला दया दाखवीत नाही. तसेच कोणाकडून दयेची अपेक्षाही बाळगीत नाही. पुश्तू भाषेचा अभ्यास करण्यासाठी 'दा किस्सा खाने–गप' (पख्तून ग्रामीण अड्ड्यावरील गोष्टी) व 'तारीख-इ-पख्तुन' (पठाणांचा इतिहास) असली पुस्तके मला वाचावी लागत होती. पठाणांचा दिलदारपणा व त्यांचे शौर्य यांच्या वर्णनानी ओतप्रोत भरलेल्या अनेक कहाण्या त्यात होत्या. एकदा एकाच थाळीत खाना घेतल्यानंतर त्या दोस्ताच्या संरक्षणासाठी स्वतःचा जीवसुद्धा गमाविण्यास पठाण कचरत नाहीत. वायव्य सरहद्दीवरील डोंगर कपारीत मेंढ्या चारणाऱ्या पठाणाशी गप्पा मारीत बसण्यापरता दुसरा कोणता आनंद असू शकेल? एका खांद्याला बंदुक लटकावलेली, दुसऱ्या खांद्यावर शाल किंवा दर्री टाकलेली. एकीकडे मेंढ्यावर नजर ठेवताना दुसरीकडे दिलखुलासपणे गप्पा मारणे हे एक पठाणच जाणे. खुट्ट वाजले की चित्त्याच्या चपळाईने राहिलाच उभा तो सहा फुटी धिप्पाड देह.

बन्नू येथे माझी पहिली नेमणूक झाली होती. त्यामुळे वायव्य सरहद्द प्रांतातील मस्त कलंदरी जीवन बघण्याची सुसंधी मिळाली. मनाची पाटी अजूनही कोरीच असल्याने पठाणांविषयी मी निर्विकल्प होतो. त्यामुळेच कदाचित मी त्यांचेशी अधिक समरस होऊ शकलो असेन. त्या प्रांतात पाण्याची टंचाई सदाचीच. ती दूर करण्यासाठी नद्या नाल्यांच्या पात्रातून खोल विहिरी खोदणे, पाण्याच्या पाटांची दुरुस्ती करणे, रस्ते सुधारणे, नवीन रस्ते बांधणे इत्यादी प्रकारे तेथील लोकांचे जीवन सुसह्य करण्यासाठी लष्करातर्फे पुष्कळ काम केले जात असे. आमच्या छावणीत एक सिव्हिलियन पठाण मुन्शी (शिक्षक) होता. संध्याकाळी घरी परत जाण्यास यत्किंचितही उशीर होतो असे वाटले की त्या भीमकाय पठाणाला कापरे भरत असे. आणि ठरलेल्या वेळीच सोडसाठी तो अनेक वेळा चक्क दहादा सलाम करून विनविण्या करीत असे. कारण त्याचे व त्याच्या काकांचे हाडवैर काही कौटुंबिक प्रसंगातून निर्माण झालेले होते. त्यामुळे तो काका त्या पुतण्याचा बळी घेण्यासाठी टपलेला असावयाचा. खास बंदूक भरून आडोशाला उभा राहिलेला असल्याचे भय त्याला वाटत असे. त्यामुळे 'मुन्शी आणि चाचा' हा नंतर चेष्टेचा विषय बनला होता. पुढे पुढे तर मुन्शीने तोंड उघडावयाचा अवकाश की आम्ही म्हणत असू "फिक्र क्यों करते हो? चाचा की बारुद भिग गयी है या आपकी सलवार?"

सरहद्द प्रांतात खुर्मानी (जरदाळू) नावाचे एक चविष्ट, आणि रसरशीत फळ होते. माझी पत्नी सौ. लीला हिला ती फार आवडत असत. पाण्याचे ओलाव्याला जरदाळूची झाडे सर्वत्र इतकी असावयाची कीं, भर मोसमांत झाडाखाली लाल–जांभळ्या–पिवळ्या जरदाळूंची सर्वत्र पखरण पडलेली दिसायची. आमच्या बंगल्याचे आवारात जरदाळूंचा जणु रंगी–बेरंगी गालिचाच पसरल्यासारखे वाटे. पण त्यापायीच सौ. लीलाची एकदा चांगलीच घाबरगुंडी उडाली होती. १९४२ साली फोर्ट सांडेमान येथे आम्ही असताना घडलेली ही हकीकत मोठी गंमतीदार आहे.

मी गेलो होतो दौऱ्यावर. घरी सौ० लीला एकटीच होती. बंगल्याचे आवार खुरमानीने बहरलेले होते. एकटीच असल्याने बाईसाहेब आरामात लोळत पडल्या होत्या. इतक्यात बंगल्याच्या भिंतीवरून उड्या टाकून दहा बारा पठाण आत घुसले. आमचा बंगला निवांत बाजूला होता. घरी आमचा ऑर्डर्ली होता. परंतु तो निःशस्त्र–आणि माझी आणखी एक बंदूक भरलेली असूनही तिचा वापर करणे कठीण. कारण एकदा एक बार टाकला की मग पुढे महा बिकट प्रसंग तशातच घरचा कर्ता पुरुष घरी नाही. सौ. लीला आणि ऑर्डर्ली दोघेही व्हारांड्यात येऊन उभे राहिले व त्यानी त्या पठाणाना मिलिटरी रुबाब दाखविण्याचा प्रयत्न केला. तेव्हा खुरमानी खाताखाताच त्या पठाणानी तिला सुनावले: "हे पहा बाईसाहेब, आपण परक्या असूनही आमच्या राज्यात घुसलेल्या आहात. तरीपण जोपर्यंत तुम्ही आपली मर्यादा ओलांडली नाही, तोपर्यंत तुमच्या नखाला सुद्धा धक्का लागणार

(पृष्ठ ५१ वर पहा)




# स्त्रियश्चरित्रम्

**सुषमा** साठे एक दिवस आमच्या कार्यालयात येऊन दाखल झाली.

आली तीच मुळी एखाद्या झंझावातासारखी !

एखाद्या विजेच्या प्रचंड लोळासारखी !

एखाद्या प्रचंड प्रपातासारखी !

सुषमा साठे कार्यालयात आली. मॅनेजरच्या चेंबरपाशी थांबली. प्यूनला म्हणाली "मॅनेजर साहेब आहेत काय?" तिचा एकूण रुबाब, बोलण्यातली ऐट पाहून तोही एकदम ताठ उभा राहिला. वाटलं कुणीतरी बडी असामी मॅनेजरना भेटायला आली असावी. त्याने स्लिपबुक पुढे केले. म्हणाला "ह्यावर नांव लिहा."

तिने नांव लिहून दिले. तो आत निघून गेला. ती समोरच्या वेटिंग-रूममधील कोचात बसून राहिली. जणु ते तिच्यासाठीच मुद्दाम मांडून ठेवले होते.

प्यून बाहेर आला. म्हणाला, "चला आत."

तिने केसावरून हात फिरवला. रुमालाने तोंड पुसल्यासारखे केले. पातळ उगीचंच सारखे केले आणि ती आत गेली. ती पंधरावीस मिनिटेच चेंबर-मध्ये असावी. बाहेर आली तेव्हा प्यूनला म्हणाली, "मला चीफ् अकाऊंटंटना भेटायला सांगितले आहे."

चिठ्ठी घेऊन प्यून माझ्याकडे आला. त्याच्याबरोबर सुषमा साठेही होती. चेंबरमध्ये जाताना मी तिला पाहिले होते. बड्याबड्यांच्या बायका ह्या ना त्या निमित्ताने त्याच्याकडे येतात हे मला ठाऊक होते. ती बाईही त्यातलीच असावी असा तर्क करीत मी समोरच्या फायलीत लक्ष घातले होते. त्यामुळे ती बाई समोर येऊन उभी राहिली तेव्हा एखादी महत्त्वाची केस मॅनेजरने माझ्याकडे सोपविल्यासारखा चेहरा करीत मी तिला म्हणालो "बसा."

"थँक्स !" म्हणत ती समोरच्या खुर्चीत बसली. बसताना ती फार गोड हसली. ती हसली म्हणून मीही हसलो.



प्यूनने कागद हाती दिले. ते पाहून मी चाटच पडलो.

सुषमा साठे ह्या स्त्रीला आमच्या कार्यालयात ज्युनियर ऑफिसर म्हणून घेण्यात आले होते. ते कागद खाली ठेवीत मी म्हणालो "ग्लॅड टु मीट यू मिस् साठे."

"थँक्स !"





अनुक्रमणिका

सुषमा साठे एम्. ए. पर्यंत शिकलेली होती. "एम्. ए. आणि ज्युनियर ऑफिसर ?" सहसा असे घडत नसे. मॅनेजर मला बोलावीत असत. मत विचारीत असत. पण सुषमा साठेंबावत मात्र—

मी सहज तिचे कागद पुन्हा चाळले. तिचे अक्षर हेही तिच्या व्यक्तित्वासारखेच रेखीव होते. तिची प्रावीण्यपदके व प्रशस्तीपत्रे तिच्या गुणवत्तेची ग्वाही देत होती. आणि मग एकदम माझे लक्ष त्या कागदावरल्या मॅनेजरच्या ऑर्डरकडे गेले. "ज्युनियर ऑफिसर म्हणून नेमणूक केली आहे." कां कुणास ठाऊक मला त्याचा मेळ बसला आहे असे वाटेना. ती व्यक्त करणे उचित नव्हते म्हणून मी उगीचच हसलो. तीही हसली. ते हसणे गोड होते.

"कुठे काम करणार ?"

"तुम्ही सांगाल तिथे."

"अनुभव?"

"नाही ! ही पहिलीच नोकरी माझी."

"पण एम्. ए. होऊन तर—"

"वरीच वर्षं झाली. नोकरीची गरजच नव्हती. नाही केली, इतकंच !"

प्रथम परिचयातच जास्त चौकशी करणे कार्यालयातला एक अधिकारी म्हणून मला उचित वाटले नाही. बाई मोकळ्या मनाची मात्र वाटली. ह्या स्त्रीची काहीतरी कथा असावी–असली पाहिजे असे उगीचच वाटून गेले.

तिला मी खाते दिले. ती प्यूनबरोबर निघून गेली. ती गेल्यावर कां कुणास ठाऊक पण मला एक पोकळी उगीचच जाणवली. तसं हळवं होण्याचं काही माझं वय नव्हतं. शिक्षण, अधिकार ह्या दृष्टीनेही मी तसा मोठा होतो. मॅनेजर होण्याची स्वप्ने मला पडू लागली होती. आणि तरीही त्या स्त्रीचे रुप, झोक, तोरा, मॅनर्स, अक्षर, गोड बोलणे आणि हसणे—

> ह्या स्त्रीची काहीतरी कथा असावी—असलीच पाहिजे असे त्याला उगीचच वाटून गेले. त्याचा अंदाज एक दिवस खरा ठरला; तिच्या जीवनाचं रहस्य हळुहळू उलगडत गेलं . . .

खरंच सांगतो मीही काही काळ हरवून बसलो. जाताना तिने गोड हसावे–बोलावे–त्या हास्याचा गुच्छ करून मी वटन होलमध्ये लावावा व त्याचा वास घेत घेत घरी जावे असे मला वाटून गेले खरे.

घरी जाताना ती खरोखरच आली. हास्याचा गुच्छ तिने माझ्या हाती दिला. 'थँक्स'चे गुलाबपाणी त्यावर शिंपडले आणि ती निघून गेली.

## प्रभाकर अत्रे

घरी परतताना तो वास घेतच मी परतलो. ते हसणे कानात नि मनात घर करून बसले होते. त्या हसऱ्या गुलाबातून मला स्वप्ने दिसत होती–तिच्या नुसत्या असण्याचीही ! ते असणे हे सुद्धा एक रमणीय स्वप्न होते. बँकेच्या रुक्ष आकडेमोडीत तेवढीच एक कविता होती.

दुसऱ्या दिवशी ती सकाळी वेळेवर कार्यालयात आली. खात्याकडे जाताना "गुड मॉर्निंग सर" असं म्हणत व स्मिताचा एक गेंदेदार गुच्छ माझ्या हाती देत ती निघून गेली. मी मनातच त्याचा वास घेतला.

दुपारी ती मला भेटली. म्हणाली, 'एक विनंती आहे."

"बोला !"

'माझ्या खात्यात एखाद्या स्त्री कारकुनाची बदली नाही का करता येणार !"

"कां बरं ?"

"सारे पुरुषच आहेत म्हणून !"

"त्यात काय झालं ? खातात की काय !"

"नाही ! ते मला खातात काय म्हणा. तशी मी भीत नाही. पण मला मैत्रीण हवी आहे. सोबत—केवळ सोबत म्हणून ! बघा सहज जमलं तर ! आय् कॅन मॅनेज ! पण तुम्ही एका बाईची मनस्थिती जाणू शकाल."

"आय् शॅल ट्राय."

"थँक्स !" म्हणत ती निघून गेली.

'माझ्याच खात्यात काम करणाऱ्या सौ. जोगळेकरांची बदली मी त्या खात्यात केली. तिची विनंती मला 'स्वाभाविक' वाटली होती. मला सोबत हवी आहे. मैत्रीण हवी आहे." ही तिची विनंती बरोबरच होती.

त्यानंतर बरेच दिवस गेले तरी सुषमा साठे माझ्या टेबलाशी पुन्हा कसलीच विनंती करायला आली नाही. दररोज सकाळी येताना स्मित आणि "गुड मॉर्निंग सर"चा गुच्छ माझ्या टेबलावर ठेवून जात होती. तिच्या खात्यात ती लोकप्रिय झाली होती. हसून, गोड बोलून कामे करून घेत होती. ती हुशार होती त्यामुळे सारी कामे तिने फार लवकर जाणून घेतली. तिची जी कामे माझ्या टेबलावर येत होती ती पाहून वाटत होते की ह्या स्त्रीला निदान दहा वर्षांचा तरी अनुभव असावा.

सुषमा साठेंचा माझा चांगला परिचय झाला होता. काम, अक्षर, स्मित, मॅनर्स ह्यांची माहिती मला मिळाली होती. पण तरीही तिची कथा मात्र







मला कळली नव्हती. सौ. जोगळेकर ह्या माझ्या नात्याच्या होत्या. पण त्यानी दिलेले धागे फार कच्चे होते–फुलाच्या पुडीच्या धाग्यासारखे. कधी वाटायचं–कोण ही सुषमा साठे? कार्यालयातल्या अनेकांपैकी एक. तुला येवढं कुतुहल कशासाठी? अधिकाऱ्याने हाताखालच्या माणसात येवढा मॉर्‌बिड इंटेरस्ट घेणं बरं नाही! शोभतही नाही. पण माझ्यातल्या माणसाचे समाधान होत नव्हते. त्याला सुषमा साठेची कथा हवी होती. तिची व्यथा तो जाणून घेऊ इच्छित होता.

व्यथा? ह्या हसऱ्या, फुलांचे गेंद उधळीत उधळीत कार्यालयात येणाऱ्या स्त्रीला कसली आलीय् व्यथा? तिची प्रतिदिनी पालटणारी खूपशी पातळं. मॅचिंग सँडल्स, पर्सेस ह्या गोष्टी काय व्यथा सुचविणाऱ्या होत्या? पण मला मात्र ते वाक्य स्मरत होते "नोकरीची गरजच नव्हती. नाही केली" त्या वाक्यातल्या गरज ह्या शब्दात कुठेतरी एखादी व्यथा असावी असं उगीचच वाटत होतं. व्यथा?

मग तिचं नेहमीचं वागणं—

नसते काही माणसांना कण्हत, कुथत आयुष्य काढायची सवय? येणारा प्रत्येक अनुभव माणसाला काहीतरी शिकवून जात असतो. त्यातून नवं आयुष्य, नवा धीर, नव्या प्रेरणा लाभत असतात अशी त्यांची श्रद्धा असते.

सुषमा साठेचं वागणं त्यातलं नसेल कशावरून?



मिस्–सुषमा साठे. एम्. ए. नोकरीची गरज नसलेली—पण आता नौकरी करणारी—मिस् असून मिस् न वाटणारी—हिचं लग्न झालं असेल? मग वैधव्य? की घटस्फोट—की काहीच नाही? हे कुवारपणा तिच्यावर निसर्गाने लादलं असेल की माणसाने? तरीही ती माणसात येत जात होती. मिसळत होती. रंगत होती. रंगवीत होती. हसत होती–हसवीत होती. आणि तरीही एखादी व्यथा—

असावी. असलीच पाहिजे हा माझा तर्क अचानकपणे एक दिवस खरा ठरला.

सकाळीच माझ्या टेबलाशी येत सुषमा साठे म्हणाली, "सर, एक विनंती आहे."

"बोला" मी म्हणालो.

"मला दोन तीन दिवस रजा हवी आहे."

"दोन तीन दिवस? कशी मिळणार? तुम्हाला कार्यालयात येऊन तर दोनच महिने झाले आहेत."

"ते मला ठाऊक आहे."

"तरीही तुम्ही रजा मागताहात?"

"सर, माझा अगदी नाइलाज आहे."

"कारण?"

"सांगायलाच हवं का? जरा खाजगी आहे."

"हरकत नसल्यास व माझ्यावर तुमचा विश्वास असल्यास सांगा. सक्ती करणारा मी कोण!"

"सर, असं कां म्हणता? मी इथे फार भीत भीत आले. तुमचा धीर होता म्हणून तर मी इथे लवकर रुळले. मी खरंच फार भ्यायले होते."

"पण कां?"

"पहिलीच नौकरी. सारंच वातावरण नवीन. कशी माणसं भेटतील कुणास ठाऊक असं वाटायचं."

"कशी भेटली मग?"

"चांगली! वाटलं मी ह्यातून पार पडेन."

"पण तुमचं हसणं, बोलणं तर—"

"होय! मला कुठल्याही भावनेचं प्रदर्शन करीत बसणं आवडत नाही. आय् ॲम अवव्ह दॅट! आय् मे बी रॉंग! अशा माणसांची मला कीव येते. आय् पिटी देम!"

"तुमची रजा—खाजगी काम..."

"हो! ते विसरलेच. सर, तुम्ही विचारलत् म्हणून सांगते. डोण्ट गेट परायट्ण्ड्! तपशील नंतर सांगेन. माझा मुलगा फार आजारी आहे सर."

"काय म्हणता?"

"यस सर, हे सत्य आहे. प्लीज रिलीव्ह मी. मला गेलं पाहिजे. कसा असेल कुणास ठाऊक?"

मी अवाक् झालो होतो. शब्द फुटत नव्हते–समोर उभी राहिलेली कुमारी सुषमा साठे मला म्हणत होती, "सर, मुलगा फार आजारी आहे."

मी मानेनेच रुकार दिला. "मेनी मेनी थँक्स टु यू सर!" असं म्हणत ती स्त्री एखाद्या विशीतल्या तरुणीच्या वेगाने निघून गेली.

जाताना तिने स्मिताचा गुच्छ ठेवून दिलाच, तेच प्रसन्न स्मित. जणु मुलगा आजारी नव्हताच. तिला तार अशी आलेली नव्हतीच.

मिस् सुषमा साठे ही अखेर एका मुलाची माता होती तर! तिने दिलेल्या स्मिताचे सारे गुच्छ मी एकत्र केले आणि त्याना वेगळे आकार देऊन एक काल्पनिक कथा मनातल्या मनात तयार करू लागलो–उगीच छंद म्हणून!!

मिस् सुषमा साठे तीन दिवसानी ठरल्यावेळी कार्यालयात आली. आल्याबरोबर माझ्या टेबलाशी येत म्हणाली, "आभार."

"रजा दिल्याबद्दल?"

"होय!"

"राहू द्यात ते! मुलगा कसा आहे?"

"खूप बरा!" म्हणाला "आई, जाऊ








नकोस ग " पण मला यायलाच हवं होतं. मी समजूत काढली."

"पटली ?"

"पटली ! तसा तो फार चांगला आहे. तुम्ही पहाल तर तुम्हाला सुद्धा आवडेल."

"घेऊन या मग !"

"इथे ? ते शक्य नाही !"

"घरी या. नांव काय त्याचं ?"

"विक्रम "

"वय ?"

"सात ?"

"मग घरी आणता कधी ते बोला."

"आणीन ! आधी सांगेन."

त्यानंतर काही महिने निघून गेले. सुषमा साठे लोकप्रिय झाली होती. मोकळं वागत होती. पण गैर-फायदा घेऊ पाहणाराना फटका-रीतही होती. अशी माणसे मग कंड्याही पिकवीत. म्हणत तिच्या पर्समध्ये एक फोटो आहे. तो ती अधूनमधून काढून पाहते. रफ् पॅडवर 'विक्रम' हे नांव अधुनमधून रेखीव अक्षरात लिहित वसते. कोण हा विक्रम ? फोटो कुणाचा ? विक्रमचा ?"

अफवांचे भेंडोळे फिरत माझ्या-पाशी आले. मला सारे ठाऊक होते. मी सस्मित मुद्रेने ते भेंडोळे परत भिर-कावले.

एक दिवस सुषमाला मी म्हणालो, "विक्रमची जपमाळ बरीच ओढता वाटतं?"

ती हसली व झकास लाजलीही. मग म्हणाली, "येत्या रविवारी विक्रम येणार आहे. चालेल ?"

"अवश्य या !"

नंतरच्या रविवारी सुषमा साठे विक्रमला घेऊन माझ्या घरी आली. पूर्वकल्पना दिलेली असल्याने पत्नीने तिचे चांगले स्वागत केले. ती व मुलगा दोघेही मोकळेपणाने वागले. निघ-ताना ती म्हणाली, "सर, आभारी आहे. मी भीतभीतच आमंत्रण स्वीका-रलं."

"कां हो ? मी माणूस आहे. वाघ नाही."

"मला माणसांचीच भीती वाटते एकूण. "

"अनुभव मोठा दिसतो."

"दुर्दैवाने !"

पुन्हा आभार मानीत ती निघून गेली.

सुषमा साठे नेमाने कार्यालयात येत होती. चोख कामे करीत होती. जणु काहीच घडलं नाही असं वागत होती. मधुनमधून स्मिताचे गुच्छ टेबला-वर ठेवून जात होती.

एक दिवस तिने डबा आणला. म्हणाली घरी मुलाना घेऊन जा ! "

"लांच ?" मी मुद्दामच चेष्टेने म्हणालो. ती गंभीर झाली. डोळे पाणा-वले. म्हणाली "सर, निदान तुम्ही तरी असं म्हणायला नको."

"आय् ॲम सॉरी इफ् यू आर हर्ट इन एनी वे ! हॅड् नो इन्टेन्शन !"

"दॅटस् ऑल राइट् ? आज विक्रमचा

वाढदिवस ! "

"अरेच्या ! मग आधी नाही का हे सांगायचं ? मला भेट आणली पाहिजे."

"तुमचा धीर व स्नेह हीच मोठी भेट आहे. त्याच्या भरवशावर तर मी टिकले आहे. तुमच्यामुळे मी खूप वर्षांनी एका कुटुंबात जाऊ शकले. मलाच माझी लाज वाटायची. सहानुभूतीने ऐकायला सवडच नाही कुणाला. साऱ्यानी मला फक्त शब्दांचे धोंडेच मारले. छद्मी हास्यच दिलं. तुम्ही मला स्नेह दिला. धीर दिला. मला याहून अधिक काही नको."

ती निघून गेली. दुपारी मी तिच्या मुलासाठी टॉफीचा डबा आणला. म्हणालो " हे विक्रमसाठी ! तुमच्यासाठी नव्हे !"

"थॅंक्स !"

"उपचार नकोत. "

"उपचार नाहीत. केवळ स्नेह. "

"तरीही नकोत."

"घेतलेच पाहिजेत. स्नेहासाठी तरी!" आणि ती निर्व्याज हसली. मी 'थँक्स'चा गुच्छ कोटात खोवला.

एक दिवस ऑफिस सुटण्याच्या वेळेला ती माझ्याकडे आली. म्हणाली, "सर, जरा त्रास देत आहे. पण काय करू ? मी एकटी आहे हो !"

"काय झालं ?"

"विक्रमचे वडील फार आजारी आहेत असं आज कळलं. "

"कुठे असतात ?"

"इथेच."

"इथेच ? मग कधी बोलला नाहीत ते ! आणि तुमचे त्यांचे संबंध तर—"

"होय ! संबंध तसे उरलेले नाहीतच. त्यांच्या नांवाचं मंगळसूत्रही मी काढून टाकलेलं आहे."

"आणि तरीही ते आजारी आहेत असं कळल्याने येवढ्या अस्वस्थ झाला आहात ?"

"सर, मला समजून घ्या. समजेल ती भावना तुम्हाला."

"काय करू बोला ?"

"मी पत्ता देते. त्या पत्त्यावरं तुम्ही जा. त्याना भेटा. प्रकृती नेमकी कशामुळे बिघडली आहे ते पाहून या. तेच कारण असणार म्हणा. "

"म्हणजे काय ?"

"तुफान दारू, धूम्रपान आणि बाई. "

"हे सारं त्यांच्याजवळ असूनही तुम्ही त्यांच्याशी संसार केला ?"

"होय ! सारं काही सहन झालं तोवर केलं. मग मारहाण वाढली. बाहेर खूप दारु प्यायची, रंग करायचा आणि मग घरी पुन्हा . . . "

'हाऊ हॉरिबल् !"

"यस् ! पण याहूनही त्यांचं वागणं हॉरिबल् होतं. पहिल्यावेळी मला दिवस राहिले तेव्हा मी खूप आनंदात होते. स्वप्न पहात होते. तयारी करीत होते. केलेली तयारी त्याना दाखवीत होते. पण त्यांचा चेहरा मख्ख असे. वाटे हे असं कां ? एक दिवस ते बाहेरून आले. मला खूप प्रेमाने हाक मारली. म्हणाले, "तू आता आई होणार आहेस. नाही का ? " मी सहजच "हो ना !" असं म्हणाले. मी खुषीत आले. आणि महिन्यांचा हिशोब मी त्यांच्या कानात सांगितला. स्वतःशी हसले.

तेही खूप मोठ्याने हसले. मला तो टोन वेगळाच वाटला. मग जवळ येत म्हणाले "तीनच महिने राहिले नाही ? मग बाळराजे येणार. वाजत-गर्जत येणार !" आणि आवाज बदलीत ते म्हणाले, " कसे येतात ते मी पाहतो. " त्यामागून त्यानी फाड् फाड् माझ्या मुस्कटात मारल्या. मला ढकलून नेऊन त्यानी खाली पाडले. आणि ते माझ्या पोटावर एखाद्या वेताळासारखे नाचले."

"भयानक ! पाशवी !" मी म्हणालो.

"हो ना ! पाशवीच. पण त्यातून घडायचं ते घडलंच ! मग मी त्याना टाळू लागले. ते जवळ आले की दारुच्या पेल्यातले ते अक्राळविक्राळ राक्षस माझा गळा दावण्यासाठीच जणु पुढे येत आहेत असं वाटत राहायचं. त्यांच्या दारुबाज चेहऱ्याभोवती त्यांच्या त्या नटव्या स्त्रिया गरगर फिरून माझ्या तोंडावर थुंकताहेत असा भास होत रहायचा. रात्री वेळी अवेळी ते येत. शृंगाराची सक्ती करीत. सर, मी सांगू नये ते सांगते. तो घृणास्पद शृंगार मला नकोसा वाटे; पण मी त्यांची हक्काची स्त्री होते, पत्नी होते. विक्रमच्या वेळी दिवस राहिले. मी मौन धरले. आणि मनाची तयारी करीत राहिले. निश्चय एक—ह्या जीवाला मी हात लावू द्यायची नाही !"








"विक्रमला त्यानी पाहिलेलं नाही?"

"नाही ! निश्चय झाल्यावर मी आईकडे गेले ती पुन्हा मी परत गेलेच नाही. त्यानी निरोप पाठवले. खूप दम भरला. विक्रम व्हायच्या आधी ते एकदा आईकडे आले. त्यानी खूप तमाशा केला. कोर्टाची भाषाही केली. मी बधत नाही असे पाहताच काही अभद्र आरोपही केले. नाही ! मला ते आता सांगवत नाही. मी ते सारं विष पचवलं असलं तरीही मी अखेर माणूस आहे सर. घटस्फोट मान्य झाला. कोर्टातून खाली उतरताना शेवटच्या पायरीवर मी गळयातलं मंगळसूत्र ताड्कन् तोडलं आणि त्यांच्याकडे भिरकावलं. म्हणाले "तुमच्या अभद्र आणि ओंगळ सहवासाची ही शेवटची खूण. सांभाळा. सुटले मी." ते काहीही बोलले नाहीत. मंगळसूत्र खिशात टाकून ते निघून गेले.

पुढे विक्रम झाला. मी त्याच्यासाठी जगते आहे. कधी तो त्यांच्याबद्दल विचारतो. मी सांगते "ते फार चांगले होते ना म्हणून देव त्याना आपल्याजवळ घेऊन गेला."

"कमाल आहे तुमची !"

"मला त्रास होतो हो. पण मला त्याला त्यांच्यापासून दूर ठेवायचं आहे. त्यांची अभद्र छायाही त्याच्यावर मला पडू द्यायची नाही. त्याला यातलं काहीही कळू द्यायचं नाही."

"आणि तरीही ते आजारी आहेत म्हणून तुम्ही इतक्या अस्वस्थ झाला आहात?"

"होय ! लौकिक अर्थाने ते आता माझे कुणीही नाहीत हे मला कळतंय्. सारं काही संपलं आहे. मी माहेरचं नांव लावते. आणि तरीही नैतिकदृष्ट्या सारं काही संपलंय् असं वाटत नाही. विक्रम त्यांचाच आहे. हया गात्रांचे तेच स्वामी आहेत असं कुठेतरी जाणवत राहतं. जाल ना तुम्ही?"

"जाईन. पण समजा ते खूप आजारी आहेत असं कळलं तर तुम्ही जाल त्याना भेटायला ? त्यांची सेवा कराल?"

"कदाचित करीन. कदाचित करणार नाही. कदाचित मी मुळीच जाणारही नाही. तरीपण तुम्ही जायला हवं. जाल ना ?"

सुषमा साठेचं एक आगळंच रूप मी पहात होतो. मी त्या शब्दामधल्या वेदनेचा विचार करीत होतो.

मी गेलो. सुषमाचे यजमान मुळी शुद्धीवरच नव्हते. मी ओळख सांगून प्रकृतीची चौकशी केली. त्या माणसाला आकर्षक रूप होते. व्यक्तित्व लाभले होते. पण साऱ्या गोष्टींची त्याने माती करून टाकली होती. त्या मातीला मनोमन नमस्कार करीत मी बाहेर पडलो.

सुषमाला सारा वृत्तांत सांगितला तेव्हा ती म्हणाली "सर, मला गेलं पाहिजे. कदाचित् मी, उद्या येणार नाही. ते शुद्धीवर येईपर्यंत कदाचित् मी येणार नाही. शुद्धीवर येताहेतसं वाटलं की येईन."

"विक्रमला नेणार?"

"त्याचा काय संबंध ? संबंध माझा आहे."

त्या उत्तराची मला गंमत वाटली. सारे आघात झेलण्याची तिची तयारी होती. पण विक्रमला मात्र त्याचा वाराही लागू द्यायचा नाही हा निश्चय ती पाळीत होती. टाकलेल्या नवऱ्याच्या आजाराच्या कल्पनेने ती वाकली होती. पण विक्रमच्या विषयात मात्र ती ताठ होती.

दोन दिवसानी सुषमा आठे कार्यालयात आली. तेव्हा ती पूर्वीसारखीच टवटवीत होती. चेहरा हसरा होता. स्मिताचा गुच्छ हाती देत म्हणाली "सर, सुटले मी !"

"म्हणजे काय ?"

"ते गेले. काल रात्रीच गेले." तिच्या दृष्टीने जणु ती सामान्य वार्ता होती.

"मग तुम्ही त्यांची सेवा . . ."

"केली ! एकच दिवस. ते शुद्धीवर आलेच नाहीत म्हणून सेवा घडली. ते गेले. मी त्यांच्या अंगावर चादर घातली. आणि त्याच तिरिमिरीत बाहेर पडले. विक्रमच्या होस्टेलवर गेले. त्याला जवळ घेऊन खूप रडले. तो गोंधळला. मी त्याला म्हणाले "आज मला तुझी खूप खूप आठवण झाली रे." तो खुलला. म्हणाला, "आई, कित्ती ग माया करतेस माझ्यावर !" मी पुन्हा त्याला जवळ घेतलं. रडले. त्याच्या स्पर्शात आमच्या कितीतरी सुखद आठवणी मी बुडवून टाकल्या. परतले, तेव्हा एक डोळा रडत होता. एक हसत होता. आज मी मुक्त झाले आहे. उरात वेदनेचा आक्रोश आहे. आणि आनंदही डुचमळून बाहेर येऊ पाहतो आहे. इट् इज स्ट्रेंज ! पण खरं आहे ते. थँक्स !"

"कशाबद्दल !"

"सहानुभूतीबद्दल ! त्याचं मोल माझ्या अवस्थेतून गेल्याशिवाय कळायचं नाही. पण वैऱ्याच्या वाटचालाही ती अवस्था येऊ नये." असं म्हणत सुषमा साठे आपल्या जागेकडे निघून गेली. जाताना ती हसली. तेच नेहमीचे-- प्रसन्न हास्य. पण आज त्या हसण्याला दोन कडा होत्या–एक होती पौर्णिमेची —दुसरी अवसेच्या अंधाराची! !

सुषमा साठेच्या खात्यात हास्यविनोद चालू आहे. सुषमाही खदखदून हसते आहे. जणु काही घडलंच नाही. वादळं आलीच नाहीत. सारं काही जियल्या तिथेच होतं. क्वाइट नॉर्मल ! ! तिचं हसणं मला दिसत आहे. कया कानात गुंजते आहे. त्या धाग्यातून एक वस्त्र विणण्याचा यत्न मी करतो आहे. कुठून तरी तीर येतो. वस्त्र फाटते. शब्द येतात. "बाबारे, ही व्यर्थ खटपट कशासाठी ? स्त्री हे एक महान कोडे आहे हे तुला ठाऊक नाही?"

●●●



**गुहेसारख्या** दिसणाऱ्या त्या पोफळीच्या सुक्या पानानी शाकारलेल्या झोपडीत जॅक आणि आश्विन शिरले तेव्हा रात्रीचे अकरा वाजले होते. गुहेत आणि त्या झोपडीसारख्या वास्तुत फरक एवढाच होता की येथून पेट्रोमॅक्सच्या भग-भगीत प्रकाशाचे एक प्रचंड कलेवर रस्त्यावर येऊन गाडी-खाली सापडलेल्या कुत्र्यासारखे निपचित पडले होते. जॅकच्या डोळ्याना तर तो इतका प्रखर प्रकाश सहन झालाच नाही. एक हात उन्हासाठी धरावा तशा तऱ्हेने धरून त्याने प्रवेश केला. आश्विन जॅकच्या पाटोपाठ त्याच्याच काळ्याभोर सावलीखालून गेल्याने किमान त्याला प्रकाश चुकवता आला.

आता गिऱ्हाईकेही संपत आली होती. रात्री नवापासून तळघरातून बाटल्या काढता काढता आणि त्या गिऱ्हाईकाना पुरवता पुरवता त्या खोपटाचा झिंगलेला मालक थकून गेला होता. अर्थात् ही वेळ धंद्याची होती. आळस उपयोगी नव्हता. आपल्यासाठी काढून ठेवलेल्या खास बाटलीतून तो आता अधे-मधे स्वस्थपणा मिळाला की स्वतःच पिऊन विक्रीला वेगळी रंगत आणीत होता. त्याचे कसब और होते. एकदा इकडे वळलेले गिऱ्हाईक दुसऱ्या झोपडीत रमत नाही असे जॅकला त्याच्या तोंडून प्रत्येक फेरीला किमान पन्नास वेळा ऐकावे लागे. तरीहि त्याच्या बडबडीकडे लक्ष न देता तो इथेच अड-मडत होता. कधी आश्विनला सोबत आणी. कधी परेराला, तर कधी हाताखालच्या चार-दोन शिकाऊ पोरांबरोबर.

एकेक बाटली त्यानी सोडा वा पाणी न टाकताच तोंडाला लावून रिचवली. आश्विनला जेव्हा हे अशक्य झाले तेव्हा पराभव पत्करून त्याने सर्वांगाचा दाह झाल्यासारखे हातपाय झाडले आणि पाणी मागविले. त्याच्या फजितीचे भांडवल विनोदासाठी जॅकला पुरेसे ठरले. तो सगळ्या खोपटाला उद्देशून बोलल्यासारखा आवाज काढीत राहिला.

"याऽर ! क्या कमजोरोंकी औलाद हो ! पिताना साल्याना पाणी, सोडा लागतो. अरे, रॉ घ्या रॉ. पहिल्या धारेची कबूल. नाही घेववत पण हाती लागेल त्या बाटलीतहि पाणी ? . . . . . . हे साले बियरवाल्यांचे चोजले ! म्हणे किक् हवी !"

आश्विनने अर्थात्च त्याच्या या टीकेकडे ढीम लक्ष दिले नाही; मात्र तो जॅकबद्दल जरूर तो आदर नजरेत खेळवीत राहीला.

शेवटी पिणे झाल्यावर त्यानी अडखळणाऱ्या पावलानी गुहा सोडली.



त्यांची संमिश्र एकच एक विद्रुप सावली रस्ताभर पसरली. रस्त्यावर झुलू लागली. आणि हळूहळू ती रस्ताभर पसरलेल्या चंद्रप्रकाशात वितळली.

गार वारे अंगाला स्पर्श करून गेले तसे दोघांच्या डोक्यात गरगरू लागले. मद्य मस्तकात भिनले, आणि पावलाना शरीर पेलवेनासे झाले. अधुनमधून एकमेकाना ढुशा देत रस्त्यावरून ते ओघळू लागले. एकमेकाना ठेचाळल्यावर जॅक 'सॉरी' म्हणायचा प्रयत्न करी. पण त्याच्या बोबड्या बेताल जिभेतून तो शब्द साकार होऊच शकत नव्हता आणि आश्विनच्याही मेंदूतून त्याचा अर्थ शिरायला कुठे वाव होता ?

एका तिठ्यावर थांबल्यावर जॅकचे लक्ष आकाशात गेले. चंद्राकडे पहाता पहाता त्याने बसकण घेतली. आपण ऐन रात्री अशा स्थितीत रस्त्यावर घोळ घालायला सुरुवात केली तर पंचाईत होईल, म्हणून आश्विनने जॅकला उठवायचा

प्रयत्न केला. त्याच्या हाताना जॅकच्या लठ्ठ शरीराला जागीच हलविण्यापलीकडे जोर नव्हता. जॅकने त्याला केव्हातरी झटकून दिले, आणि रस्त्यावरून चंद्राकडे पहात राहीला. घरांच्या उभ्या आडव्या रेषा त्याला छळू लागल्या. त्या चंद्राच्या मार्गात येऊ लागल्या. काही घरा–इमारतीचे शेंडे तो वसल्या जागेवरूनच दूर करण्याचा प्रयत्न करू लागला. पहाणाराला वाटावे जॅक हवेत पोहतोय् !

थोड्या वेळात त्याने हातवाऱ्यांसह एक कुठलेसे इंग्रजी गाणे वडवडायला सुरुवात केली. आश्विनच्या पोटात धस्स होऊ लागले. नाही म्हटले तरी अब्रूचा सवाल होता. जॅकचं ठीक होतं. त्याला सगळेच 'अवलिया' म्हणून ओळखीत होते. जॅकला गाणे चढू लागल्यावर त्याची पावलेहि ताल धरायचा प्रयत्न करू लागली. पण त्यात कुठेच संवाद जुळत नव्हता. अर्थात् जॅकच्याही ते ध्यानी आले आणि तो अर्ध-शुद्धीतही स्वतःलाच हसला, कुंडीतल्या पसरट वेलीसारखा. आश्विन हतवल झाल्यासारखा त्याचे नृत्य पहात राहिला.

"आश्विन, चंद्र पाहिलास ?" जॅकला जरा शुद्ध आली. चरफडत आश्विन म्हणाला,

"जॅक, इसके वास्ते तेरेसाथ आता नही. साला सगळी घाण करतो. अब्रूची अशी तशी करतो."

"गप्प वे. चंद्र ! ......" आणि आश्विनच्या सुबुद्ध वडवडीकडे लक्ष न देता आपल्याच नादात वडवडत राहिला, "बहोत दूर है कमीना. नाहीतर बोतलके माफक दुसऱ्या बगलेत मारून रात्रंदिवस हिंडत राहीलो असतो. वास् ! नाच... गाना !"

जॅकने आनंदात एक गिरकी घ्यायचा प्रयत्न केला; आणि ती पूर्ण व्हायच्या आतच तो धाड्दिशी खाली कोसळला. पुन्हा बंद दुकानाच्या पायऱ्यांचा आधार घेत तो उठला. आश्विनचा आधार घेत त्याच्या अस्तित्वाची आठवण झाल्यासारखा बोलू लागला, "आश्विन, बेटा शुद्धीवर आहेस अजून ! .... साला पानीमे शराब ....शराबमे पानी....धुत् तेरी ! अब्रूकी बात करता है ! ....गधा....देख ! वो देख ! आसमानमे चाँद !"

"तूच पहा. होपलेस."

याचवेळी समोरच एका चर्चच्या आभाळात शिरू पहाणाऱ्या शिखरात बाराचे ठोके पडले. त्यापाठोपाठ चर्चची घंटा ऐकू येऊ लागली. एरवी त्या शांतवेळी तो निनाद जगातल्या केवळ पावित्र्याचा घोष करीत असल्यासारखा भासला असता. पण जॅकच्या डोक्यात भिनलेली मदिरा अशा विचाराना थारा द्यायला तयार नव्हती. त्याने दोन्ही हातानी कान गच्च दाबून धरले. मद्य प्यायलेले ओठ वेडी–वाकडी हालचाल करीत कमालीचा तिरस्कार प्रकट करू लागले. एक उचकी आल्यासरशी ओठांच्या कडातून आंबट ओला पदार्थ ओघळला. त्याच्या शर्टावर सांडला. आश्विनला शिसारी आणि कीव वाटली. त्याच्या या अवस्थेकडे पाहून तो म्हणाला,

> **जॅकला त्या रात्री पशू व्हायचं होतं, आश्विनबरोबर तसं आधी ठरलंही होतं... पण आयत्या वेळी त्याला अनुभव आला तो भलताच नि आश्विनला तो नुकताच जन्माला आलेल्या अर्भकासारखा भासला ...**

"काय झाले जॅक ? त्रास होतोय् का ?"

"अँ ? ....काय् ....काय म्हणतोस ?"

"जॅक, कुछ माँगता है ?"

"नहीं— !" तो दरडावल्यासारखा ओरडला. कान बंद करीत तो ओरडू लागला.

"नको होतो हा आवाज..... नको त्यावेळी हा दगा देतो. इस आवाजको साला गोली मार देना चाहिये. .... आश्विन—"

"जॅक ? क्या है ?"

"आश्विन्, आज आपलं ठरलंय्. आठवतं ?"

"काय ? काय ठरवलंय्—तुला किनई फार चढली आहे. तू.... तू..."

"चूप्. कंबख्त नशेत खोटं बोलतो !"

—" नाही रे जॅक !"

"आज पशू व्हायचंय्. तूच म्हणालास ना–आठवतं ? ....मघाशी एक आणखी घशाखाली टाकायची होतीस. उसके विना जानवर कैसे बनोगे ? —"

## वा. रा. सोनार

"गंमत रे ती. तू उठ. उठ म्हणतो ना !"

"गंमत अशी करतात ? इथे सालं सगळ लाइफ मुठीत घेऊन उभा मी, तूं गंमत करतोस ? डरपोक. इन्सानियतवाला. तो आवाज फाड आधी."

"ते आपल्या हातात नाही रे. जाऊ दे ना."

"पशू व्हायचं ना, मग या पवित्र आवाजासाठी कानात दडे घाल. जमेल तसे. सगळी तकलीफ आहे."

"जॅक—घरी चल. फार झाली आज."

"उद्या. उद्या पहाटे. आज रात्री नको. आज रात्री पशू. आय् वॉंट मून ! चंद्र !! ...पागल."

"जॅक, गस्त घालणाऱ्यांच्या फेऱ्यात अडकलो तर इज्जत —"

आणि जॅकने डोक्यातला विस्तव आश्विनवर फेकला. भीषण पहात राहील. आश्विनच्या त्या स्थितीचीहि कीव आली त्याला, तेव्हा पुन्हा त्याच्याच खांद्यावर आपली मान टाकून तो विव्हळत राहीला.






"थँक गॉड. चंद्राचं देऊळ नाही केलं अजून आम्ही. किमान आजच्या रात्रीच्या चंद्राचं....आश्विन, अरे सालं, सगळी-कडे प्रीचिंग, कीर्तन, घोष ....वकवास. अमानुष. त्यापेक्षा पशू वरं."

"जॅक, तू शुद्धीत नाहीस म्हणून असं—"

"चूप. तुझ्या शुद्धीचंच मला वाईट वाटतं. नेक्स्ट टाइम. जातोस कुठे. अव चलो. चलऽ."

आश्विनने ओळखलं. जॅक आता पुरा जाम झालाय्. त्याला ही अशी अधूनमधून लहर येतेच. विशेषतः कारखान्यात वरच्या साहेबाचा रोष झाला की जॅक त्या रात्री पशू होतो! त्याला ना वायको ना आई घरी. त्यामुळे असे पशुपण घोषित करून रात्र जागवतो. कधी एकटा तर कधी आश्विन-सारख्या नवख्या दोस्तावरोबर.

एरवी लेथवर काम करताना एकेका शतांश सेंटिमीटरची मोजमापं घेण्यात गढून गेलेल्या जॅकला कुणी कारखान्यात पाहील तर या रात्रीच्या उध्वस्त जॅकवर विश्वास ठेवणे कठीण गेले असते. आता आश्विनचे मनगट जॅकच्या हातात होते. पशू होण्याच्या कल्पनेने झपाटलेला जॅक त्याला फरफटत ओढीत होता; आणि वघता वघता ते दोघे भेलकांडत रात्रीचा दिवस करणाऱ्यांच्या वकाल वस्तीत घुसले.

यापूर्वीहि जॅकने आश्विनवरोवर आणि आणखी कित्येकांसह ही गल्ली पायाखाली तुडविली होती. रात्र रात्र धिंगाणा घालून तेथूनच कारखान्यात गेला होता. पण असे एकादे ठिकाण त्याने आपलेसे केले नव्हते. या गल्लीच्या रिवाजाला जॅक त्याच बेफिकीर थाटात वागत होता.

आतासुद्धा जॅक त्या गल्लीत धडपडत शिरला तेही कुठल्याहि दारावर थाप मारण्याच्या इराद्यानेच. त्यामुळे सुरुवातीलाच जॅक ज्या पायरीवर ठेचाळला त्याच पायरीचा आधार घेत त्याने आपला तेथवर घट्ट पडून घट्ट झालेला तळवा, फणा हापटावी तसा विषारीपणाने आदळला, इतका की या लहानशा प्रकारानेहि आश्विन किंचित् शहारून दोन पावले मागे झाला. पहिल्या थापेने दार उघडले गेले नाही तेव्हा जॅकचे मद्य डोक्यात भयंकर उसळी घेऊ लागले. त्याला चेव आला. आणि त्याने आपला वाभळीच्या जून खोडासारखा आपला गुडघ्यापासूनचा पाय दाराच्या पेकाटात हाणला. तोंडाने अर्वाच्य शिव्या हासडत राहीला.

थोड्या वेळाने दार उघडले गेले. पण त्यात स्वागताचा लवलेश तर नव्हताच, होती फक्त घृणा. सांडपाणी फेकावे तशा शिव्यांचा वायकी आवाजात अहेर जॅकला मिळाला. सबंध पेंगुळलेली जागत असलेली गल्ली जरा चुळबुळली. कुठेकुठे दिवे पेटले. खिडक्यांतून चेहरे उगवले. चार-दोन वघ्यांची गर्दी कावळचाच्या छत्रीसारखी रस्त्यावर उगवली.

सगळीच आळी जेव्हा जागू लागली आहे हे त्या घरातून वाहेर आलेल्या स्त्रीच्या ध्यानी आले, तशी तिनं आपल्या शिव्याना तार-स्वरात चढविले. वातावरण पेटविता येईल तितके पेटवत राहिली.

भिकाऱ्याला हाकलून द्यावा तसा जॅकवर मारा झाला. पण तो वास्तविक संतापाने वेभान व्हायचा. वास्तविक आश्विनला तीच भली मोठी काळजी होती. जॅकचा संताप एखाद्या उन्मत्त वादळासारखा असे हे त्याला ठाऊक होते. तशात तो आता तर्र होता. विचारायलाच नको.

पण जॅक त्या वकाल वस्तीतल्या वास्तूच्या पायाशी पडलेल्या दगडाइतकाच मख्ख राहिला. एखाद्या पुतळ्यासारखा.

समोरच्या दारातून उभ्या असलेल्या स्त्रीदेहाला चुकवून येणाऱ्या प्रकाशात तर आश्विनला आश्चर्य वाटले कारण मघापासून हिंस्त्र श्वापदाचा चेहरा आता जॅकने टाकून दिला होता. आणि खूप प्रवास करून आल्यावर शॉवरखाली 'यथेच्छ' आंघोळ करताना क्षीण हरपत असल्याचा जो सुखद अनुभव, आनंद मिळतो तोच आता जॅकच्या चेहऱ्यावर ओसंडत होता.

"लाज नाही वाटत इतक्या रात्री असे जंगलीपणाने दार ठोठावता. वेशरम. निर्लज्ज....." आणि त्या भडीमारातून जॅक आपले म्हणणे पुढे रेटीत राहिला, "हमे अंदर आना है. बस्. और कुछ नही." त्याने स्वतःचे अवजड शरीर त्या दारातून पुढे घुसवण्याचा अमानुषपणात जमा होईल असा प्रयत्न केला. त्यावर त्या चिडलेल्या स्त्रीने आपल्या हातानीच बडवायला सुरुवात केली. त्याचा जॅकवर काहीच परिणाम झाला नाही. तो तिच्यासह घरात शिरायचा जोर करू लागला. तेव्हा नाईलाजाने तिने तोंडाचा पट्टा चालूच ठेवून पायताणाने पाठीवर चार रट्टे हाणले. जॅकला कसलीच शुद्ध नव्हती. तिचा प्रतिकार समजावून घेण्याच्या स्थितीत जॅक अजिबात नव्हता.

त्याचे ते वासनेने लवथवलेले हिणकस शरीर आणि त्याच्या ओंगळ पाशवी हालचालीनी आश्विनच्या मनी किळस उत्पन्न झाली. म्हटले तर त्याच्या या धटिंगणपणाची गंमतहि वाटली!

हिंस्त्र जॅक आणि त्याच्या कचाट्यातून सुटू पहाणारी ती दारातली वेश्या यांच्या झटापटीत आश्विनच्या डोक्यात






प्रकाश पडला आणि त्याचे निम्मे मद्य खाली उतरले. तो फाड-फाडून त्या बाईकडे पहात राहिला.

ती भरत आलेली गर्भारशी होती !

जॅक आपला पिच्छा सोडीत नाही आणि कुणीच मदतीला येण्याची चिन्हे नाहीत असे पाहिल्यावर तिने दारातलेच एक विजेचे बटण दाबले. त्या भगभगीत प्रकाशाने क्षणभर जॅकच्या डोळ्यांपुढे अंधारी आली आणि त्याने डोळे चोळीत उघड-झाप करीत जेव्हा तिच्या उराला हात घातला तेव्हा तोही चपापला. तिचा भरू आलेला गर्भच त्याच्या टचटचीत हाताना लागला. त्याला वाटले, पोर त्या स्पर्शाने आतल्या आत रडलेही असावे !

"इसीलिये. इसीलिये मैं नही कहती हूँ. पागल. कैसा जान-वर है! .... सहा महिने झाले..... ठाऊक नाही ? कसले गटार् पाणी पिऊन झोप खराब करतात !" जॅकच्या मुठीतले बळ संपले आहे हे ध्यानी येताच तिनं आवाज चढविला. पवित्रा बदलला. आपला निर्णय झटकन् बदलून जॅक पुन्हा पशूसारखा होऊ नये म्हणून तिने आपले पोट चक्क प्रकाशात धरले. थरथरत प्रतिकारासाठी सिद्ध झाली. एव्हाना जॅकच्या चढ्या अमानुषतेची तिला कीव आली. अजूनहि जॅकचे तळवे तिच्या लिबलिबीत खांद्यामध्येच रुतलेले होते.

"सोड रे ! आता तरी सोड ना. कसा वेडा आहेस रे तू ? ...." आणि जॅकचे दोन्ही हात गच्च आवळून घेत ती त्याला लोटू लागली. आश्चर्य म्हणजे हवा भरलेल्या फुग्या-सारखा जॅक घरंगळत खाली आला. आश्विनला मग बळ आले. त्याने त्याची मानगूट धरली. दोन शिव्या घातल्या. त्या पोटु-शीला सहानुभूती दाखवण्याचा एवढाच मार्ग आता आश्विन-साठी होता.

पायऱ्यांखाली ते दोघे उतरले असे पाहून त्या स्त्रीने घराचे दार धाडकन् बंद केले !

जॅक तेथेच पायरीवर सगळं बळ गेल्यासारखा मटकन् खाली बसला. कपाळावर घाम डवरून आला. तो त्यानें पुसून काढला. त्या बंद दाराकडे त्याची झिंगलेली दृष्टी जाताच तो अस्वस्थ झाला. मग आश्विनकडे डोळे भरून पहात तो खालच्या आवाजात पुटपुटला, "आश्विन्, तू हो पुढे. आता तू. साला तू डरपोक आहेस. मी पक्का पशू होत होतो.....ये कैसी तकदीर है ! ....जाना दो. तुम....अब तुम"

आश्विनने त्याला जरा थोपटलं. जागचं उठवलं. नाही म्हटले तरी आश्विनने त्याची धास्ती घेतली होती.

"जॅक, झालंय काय तुला ? हे काय ?"

"बेटया, तुला चढली नाही नशा, मी काय करू ?.... आय् वॉन्ट मून !....मून !! ...."

जॅक आकाशाकडे पहात राहिला. चर्चच्या घड्याळात आणखी तासाचे ठोके पडले. तो पुन्हा शहारला. आश्विनला गदगदा हल-वून तो म्हणाला, "आश्विन्, पहा पुन्हां तोच आवाज. यार, सब मजा किलकिला होता है ! ...आश्विन्, तू जा प्रीचिंगला. कॉवर्ड ... "








"तुला वेड लागेल अशाने जॅक."

"यू ब्लडी. तू पुढे हो आता. म्हणे वेड लागेल. मी एक-टयाने फक्त पशू व्हायचं. आणि तू ?"

"मला नाही रे जमत–"

"गप्. मला माहीत आहे. तू फक्त गंमत पहाणार. मला सावरणार. या तुझ्या हातानी, छी : !"

आश्विनने त्याची कॉलर पकडीत कसेबसे उठवले. त्याच्या बेताल बडबडीकडे लक्ष द्यायचे नाही, ठरवले. त्याच गल्लीच्या अंधाऱ्या गर्तेत पुन्हा ते घुमत राहिले. केव्हातरी तासाभराने त्यांच्या स्वागताला मुहूर्त लागला.

एका घराचे दार किलकिले झाले. पाठीमागून गोडवा पांघर-लेले शब्द आदळले,

"आईयेजी, घर आपलंच आहे."

जॅकला असे मिळमिळीत शब्दानी स्वागत फारसे आवडले नाही. मध्येच उचकी आल्यासारखा तो त्या अंधाऱ्या गल्लीच्या खुज्या घरांआडून तुरळक दिसणाऱ्या चंद्राला आभाळात शोधत राहिला. दुसऱ्या हाताने आश्विनला पुढे ढकलले.

कोठी चालविणाऱ्या ठेकेदार प्रौढ स्त्रीने दोघांचे आर्जवी स्वागत केले. त्या कुबट खोलीत एकाद्या हॉटेलात काऊंटर असावे तशा या प्रौढ बाईचा जामानिमा पडलेला होता. आणि ती आतल्या एकटया एक तरुणीवर पैसे मिळवीत होती.

आश्विन अधाशासारखा आतल्या खोलीत पाहू लागला. त्या प्रौढेने त्याची हालचाल ओळखली; आणि आपला भरदार गोरा गुबगुबीत हात पुढे करून त्याला आत जाण्यास खुणावले; आणि जॅककडे वळून ती मंजुळा पुटपुटली,

"माफ करा. तुमच्या मित्रानंतर आपणच—"

जॅकचे तिच्या बोलण्याकडे बहुधा लक्षच नसावे. त्याने नखाने जमीन उकरीत मान हिसळली. आणि स्वतःशीच बोलावे तसा पुटपुटला,

"कुछ बात नही."



जॅक आता बैठकीच्या खोलीत एकटाच बसला. त्याच्या गलथान हालचालीनी ती अशक्त कॉट दोन–तीनदा चांगलीच कुरकुरली. यावर ती प्रौढा हळून अगत्यशील हसून म्हणाली, "हळू हं. जरा नाजुक आहे."

यावर जॅकला अशावेळी ठरलेला विनोद करायची क्षणिक उबळ आली, पण मद्याने त्याच्या सर्वस्वाचा ताबा घेतला होता. त्याला आज पिसाटल्यासारखे झाले होते. पिसाटपणातहि त्याला तहान होती पिसाटपणाचीच, पशुत्वाची.

त्याने हळूच वर पाहिलं.

दिव्याच्या मंद प्रकाशात ती प्रौढ वेश्या अजूनही एकाद्या बकाल विनोदाची अपेक्षा करीत आपले स्मित गालांवर राखून होती. जॅकने वर पहाताक्षणी तिनं पुन्हा एकवार या स्मिताला तजेला आणायचा प्रयत्न केला.

आणि जॅकला ती कमालीची आकर्षक वाटली.

मघाशी चंद्र एका बगलेत घेऊन हिंडायची कल्पना त्याच्या मनाच्या पृष्ठभागावरून मासळी उसळी घेते तशी पुन्हा चमकून केली; आणि आपलेच गोबरे गाल आपल्या दणकट पंजात घेत तो खर्जात तिला म्हणाला, "तू ?..."

यावर खरे तर त्याला खूप बोलायचे होते पण बेटे मद्य बेहोशीची वर्तुळं डोळ्यांसमोर आणीत होते. या वस्तीत इतक्यांदा येऊनही ही आपणास यापूर्वी कशी दिसली नाही, याचे तो आश्चर्य करीत राहिला. मंद प्रकाशात साधारणपणे कोणतीही स्त्री सुंदर दिसते हा त्याचा आडाखा होता. पण या रूपाकडे आपले लक्ष न जाण्यात आपली चूक झाल्यासारखे वाटू लागते. त्याला वाटले, ज्या अदबीने ती बोलतेय-वागतेय त्यामुळेच ती अधिक आकर्षक वाटत असावी.

"माझी कोठी आहे. जुनी आहे..... तुला मी नेहमी पहाते या गल्लीतून—"

एरवी जॅक शरमेने झुकला नसता या तिच्या बोलण्याने, परंतु मघाच्या झोंबीमुळे त्याला लाज वाटली. वाटले, हिने ते पाहिले नसावे ना ! विषय टाळायच्या हेतूने तो खोलीभर सैर-भैर नजर पिटाळीत राहिला; आणि ती मौन राखून बसल्या-वर तिच्याकडे एकटक पहात राहिला.

"क्यों देखते हो इतना....मला वाटते की तू आता माझा घास घेणार. बापरे !"

यावर जॅक जेमतेम हसला. या तऱ्हा त्याला परिचित होत्या.

जॅकच्या काळजात एक मंद लहर उठली. त्याच्या सर्व शरीरभर रोमांचांचे रान उठले. तो पुन्हा निश्चलपणे तिच्या-कडे पहातच राहिला. असे पहाणे या वस्तीत नवीन नव्हते, किंबहुना अपेक्षित होते. जॅकच्या गालांवर शांत जलाशयावर उठणाऱ्या तरंगांसारखे स्मित उमटले. अमाप, सहज, अगदी मानवी. तिला तो काही म्हणणार तोच ती त्याला म्हणाली,








"थांबा हं. येईलच तुमचा मित्र बाहेर. बघा तरी....
अरे, अंधेरेमेभी इस घरको भूलोगे नही—"

जॅकला आश्विन अजून 'आत' असल्याचे स्मरणही राहिले नाही. तो अभावित तिकडे पहात राहिला. तिकीट काढून येणाऱ्या मित्रासाठी उगाच थांबावे तसा चेहरा करून. त्याच्या नजरेत आता तृष्णा नव्हती.

खरे तर जॅकला समोरच बसलेली प्रौढा कमालीची आवडली. मोकाट सुटलेल्या उत्तर-रात्रीच्या गार वाऱ्याला साक्ष असल्यासारखा जॅकने तिलाच एकाद्या हट्टी लाडिक मुलासारखे विचारले, "तू ?....तू काय वाईट आहेस !"

"काय ?" तिचा अनपेक्षित कल्लोळ आणि त्याचवेळी जॅकच्या काळजाला खळगा करून जाणारी तिच्या गालावर एक जीवघेणी खळी.

आता जॅकला माघार घेणे योग्य नव्हते.

"हो !.... आश्चर्य वाटेल. तूच हवीस मला.

क्यों ? इतराज है ?"

या अर्धस्फुट इच्छेवर जॅकचे डोळेच शब्दांआधी बोलत सुटले. त्याचे मन तिनं टिपलं. तरीही चतुर सावधान राखीत ती म्हणाली,

"हां हां !....तसं नाही होणार. धंदा सोडलाय् मी. आठ वर्षे झाली !"

जॅकला हा तिचा विनोद खूपच आवडला. तो खळखळा हसत म्हणाला, "तू आमच्या आश्विनसारखीच आहेस.... ते काही नाही. मग काय ठरवलेस ?"

"कशाबद्दल ? सांगितले ना ! खरच धंदा सोडलाय् मी."

"धंद्याशिवाय दुसरे काही सुचतं का तुला ?...."

"वाऽ ! हे छान. तू इथे आलास ते काय प्रेम करायला की काय ?.... म्हणे धंद्याची बात नको !

"देखो, मेरा दिमाग बुरा है. जॅकला असं पराभूत करणं कठीण आहे."

"मघाशी पाहीलंच मी."

मघाच्या उल्लेखाने त्याचं रक्त उसळलं. चेहरा आरक्त झाला. शिरा ताडताड फुगल्या आणि तिच्यावर खेकसत तो ओरडला.

"चूप !.... उसके बारेमे मत बोल....माझा पराभव झाला कबूल. पण आता नाही."

'जॅक, असा बेभान होऊ नकोस. सांगते तुला. तुझ्यासारख्यांची वाट लावायची तयारी ठेवूनच ही कोठी उघडली आहे."

"मला असे पोकळ धमकावू नकोस. बकवास बंद. निदान तू तरी...."

आणि जॅक शेवटच्या वाक्याने अति मऊ झाला. त्यालाच ते खटकले असावे. आणि त्याने मग तिची मनधरणी सुरू केली. तिची स्तुती करू लागला. त्याची लाचारी, अगतिकता अंगांगातून प्रकटू लागली. लूत भरल्या कुत्र्यास झिडकारावे तसे त्या प्रौढेने जॅकला आधी नजरेने नि नंतर शब्दानी अव्हेरले.

जॅकचा हा अपमान जिव्हारी होता. तो आपल्या जागेवरून उठून तिच्या दिशेने होलपटत गेला आणि पंजांच्या फणा उभारून तिच्या गोऱ्या शरीराला भेडसावू लागला. नाही म्हटले तरी ती सराईत वेश्या दचकली. जॅकला समजावून सांगावे म्हणून ती सारे शरीर आवरीत पलंगाच्या एका टोकाशी बसत, थरथरत म्हणाली, "क्षमा करा मला. मी हे जपत आले आहे. जॅक, असं काय बरं ?... विश्वास नाही का ?"

"विश्वास, श्रद्धा, धर्म या गोष्टी इथं शोभतात का ? मूर्ख !"

"खरेच रे !....सोड मला. सोड म्हणत्ये ना."

आणि त्याच्या पंजात अडकलेले आपले थुलथुलीत स्तन कसेबसे सोडवून घेतले. पदर केव्हाच परागंदा होऊन जमिनीवर घसरला होता. आता डोळ्यात आग पेरीत ती जॅकवर उसळून आली. पोलक्याचे बंद ताडताड तोडीत तिनं आपली लोंबलेली छाती जॅकपुढे धरली आणि सगळ्या जगाला उद्देशून म्हणावे तशी जॅकवर खेसकली,

"जॅक !....कसा पशू आहेस रे ?....मी नाही सांगत्ये अन् तू खुशाल ?.... जनावर ! घे. घे ना आता. तुला अशी विटंबना हवी ना !...." आपण काय करताहोत याचे तिला भान राहिलेच नाही. ती भरल्या गळ्याने जॅकला पुन्हा तुटक तुटक सांगत राहिली, काहीशी त्वेषाने, काहीशा चिडीने.

"जॅक, या गल्लीत जपण्यासारखं एवढंच उरलं आहे. आठ वर्षे झाली. मी नित्याने पाळीत आले. कुणा पुरुषाला जवळ केलं नाही....मला थोडं समाधान मिळतं रे !....शोभत नाही या वस्तीत तू म्हणतोस खरं आहे. पण जगत आले आहे, हेही खरेच ना. विश्वास ठेव ! ...."



महाराष्ट्र सरकारच्या कृपेने यंदाचा गणपती सहा 'कर'चा होणार

जॅक तिच्या उघड्या छातीकडे पाहूच शकत नव्हता. त्याने आपलेच तळवे प्रच्छन्नपणे कपाळावर, चेहऱ्यावर वडविले आणि नंतर झाकून घेतले.

तिच्या शब्दांवर विश्वास ठेवावेसे त्याला वाटू लागले!

त्याची आर्जवे आता एखाद्या हद्दपार गुन्हेगारासारखी मनाच्या सांदीकोपऱ्यात चेहरा लपवून उभी होती, कोसळण्याच्या वेताला.

आणि रडायला आलेल्या लहान मुलाचे निरागसपण त्याच्या चेहऱ्यावर हळुहळू पसरत राहिले.

आश्विन बाहेर आला तेव्हा त्याच्या चेहऱ्याकडे पहाण्याचे त्राणही जॅकला उरले नाही. आश्विनला पहाताच प्रौढेने आपले वस्त्र शरीराभवती लपेटले. काय झाले असावे याची कल्पना आश्विनला येऊ शकली. जॅकबद्दलची मनस्वी चीड आश्विनच्या मनात उसळून आली आणि त्याने झोपी आलेल्या बुलडॉगसारख्या जॅकवर झेप घेऊन थाडथाड थोबाडीत दिल्या. पाठीत रट्टे हाणले. तोंडाने वडवडत राहिला, "साला पशू. जानवर!"

इतक्यात ती प्रौढा मध्ये पडली. तिने आश्विनला बाजूला ओढले. जॅकच्या या स्थितीचे तिलाही वाईट वाटले. आश्विनला दूर लोटत ती जॅकच्या पाठीमागे उभी राहिली. त्याच्या गालांवर हात फिरवीत आश्विनला म्हणाली, "मारू नकोस त्याला. त्याने काही केलं नाही. काहीसुद्धा नाही . . ."

तिचा गोरा गुबगुबीत हात हाती घेऊन त्याचे दीर्घ चुंबन घ्यायची अनावर इच्छा जॅकच्या मनात उसळली. तिच्या कणवेने भरलेल्या चेहऱ्यावरचा मंद प्रकाश डोळ्यात साठवीत जॅक एकदम उठला. आणि उंच पहाडाला पाय फुटून चालू लागावे तसा तो त्या ठेंगण्या घरातून तिरीमिरीत बाहेर पडू लागला. आणि तो त्या खुज्या घराच्या आढ्याला ठेचाळला. त्याच्या डोक्याला चांगलेच लागले; तशी तो मटकन् खाली वसला. त्याच्या डोळ्यांसमोर अंधार पसरला. त्या घराची प्रौढ मालकीण धावतच दाराशी आली. उंबऱ्यातच कोसळलेल्या जॅकच्या झिणझिणलेल्या मस्तकावरून हळुवार हात फिरवून दुःखाने विव्हळू लागली.

जॅक शुद्ध संभाळीत आणि तिचा हात अलगद दूर करीत वावटळीसारखा बाहेर पडला.

आता चंद्र उतरणीला लागला होता. त्याचा जोरही ओसरला होता. पूर्वेकडून प्रकाशाची अर्धस्फुट नांदी होत असल्याची चिन्हे आकाशात दिसू लागली.

एका मोकळ्या रस्त्याला लागल्यावर जॅक उन्मळल्यासारखा खाली वसला. आणि पहाटवारा अंगावर घेत आश्विनला कवटाळून घेत म्हणाला,

"आश्विन् . . . . काय गंमत आहे. असे पशुपण उधळायलाहि जमत नाही या दुनियेत! . . . . कमाल आहे. . . . . कमाल आहे!"

—आणि जॅक एकाद्या झुंजीत पराभूत झालेल्या, थकलेल्या खोंडासारखा मान खाली घालून विव्हळत राहिला.

—नुकत्याच जन्मलेल्या अर्भकासारखा तो आश्विनला भासला!

●●●



अनुक्रमणिका

व्यवसायाने सरकारी वकील, पण आता-पर्यंतच्या वाटचालीवरून वाटते की त्यांची संगीतातील उन्नती त्यांच्या व्यायसायिक उन्नतीलाही मागे टाकील ....

# प्रभुदेव सरदार

—दा. गो. देशपांडे



**श्री.** पु. ल. देशपांडे संगीत क्षेत्रातल्या एका योगायोगाची लक्षणीयता सांगत होते—हिंदुस्थानी संगीताच्या आजच्या थोर गायकात तीन गायक लिंगायत आहेत: श्री. मलिकार्जून मन्सूर, श्री. बसवराज राजगुरू आणि श्री. कुमार गंधर्व. या गायकांच्या परंपरेत आणि मालिकेत आपणही सतत साधना आणि तपश्चर्या करून एक दिवस स्थान पटकावले पाहिजे अशी आकांक्षा बाळगणारे श्री. प्रभुदेव सरदार हेही लिंगायत आहेत.

सोलापूरचे प्रभुदेव सरदार याना त्यांच्या शैक्षणिक जीवनात कुणी ( आणि ज्यानी ) पाहिले असते तर हा देखणा पोरगा एक दिवस सिनेसृष्टीत सर्वांचे आकर्षण बनेल असे वाटले नसते. डी. ए. व्ही. कॉलेजात असताना प्रभुदेव हुतूतू खेळत असत. त्यामुळे या व्यक्तिमत्वाचे आतले वळण गायकीचे आहे व ओढ त्याचीच वाढती आहे याची कुणाला कल्पना येण्यासारखी नव्हती. प्रभुदेवांचा कान शाबूत व अबाधित राहिल्याने श्रवणेंद्रियातून पाझरणारे संगीत चित्ताला सारखे भिडत राहून त्याना संगीताचा नाद लागला.

काय गंमत असते पहा. प्रभुदेवांचे वडील कै. बॅरीस्टर एम. एस. सरदार सोलापूरचे प्रसिद्ध कायदेपंडित व सामाजिक कार्यकर्ते. आपला मुलगाही कायदेपंडित व्हावा म्हणून त्यानी त्याला वकिलीच्या शिक्षणाची दीक्षा दिली आणि प्रभुदेवानी ती दीक्षा मिळवली सुद्धा. आज प्रभुदेव व्यवसायाने सरकारी वकील आहेत. व्यवसायाने वकिली परंपरेत ते गुरफटले असले तरी त्यांचे व्यक्तिमत्व मात्र संगीतवेधीच राहिले आहे. व्यवसाय आणि ध्यास ही भिन्न असताना जणू समांतर रेषेवरून सारख्याच गतीने प्रगती करीत असल्याचे त्यांच्या आतापर्यंतच्या वाटचालीवरून वाटते. किंबहुना संगीतातील उन्नती त्यांच्या व्यावसायिक उन्नतीला मागे टाकील इतकी त्यांची संगीताची निष्ठा अव्याहत आणि मेहनत अखंड दिसत आहे.

बाळपणापासून संगीताच्या आवडीला प्रथम शिक्षणाचे संस्कार मिळाले ते सोलापूरच्या व्यंकटेश संगीत विद्यालयाचे चालक श्री. दिगंबरबुवा कुळकर्णी यांच्याकडून. सोलापूरसारख्या छोट्या ठिकाणी संगीताच्या उर्ध्वगामी आराधनेस व व्यासंगास स्वाभाविकपणे मर्यादा या असणारच. पण प्रभुदेवानी चांगले ऐकण्याची सवय लावून घेतलेली. त्यामुळे शैक्षणिक मर्यादा त्यांच्या विकासास बांध घालू शकल्या नाहीत. याच अवधीत किराणा घराण्यास आपल्या अभिजात सुरेलपणाने उठाव आणणाऱ्या पै. अब्दुल करीमखाँ यांच्या स्वरमाधुर्याची मोहिनी प्रभुदेवांवर पडली. या काळात आणि नंतर त्यांचे जे गायन चाले त्यावर अब्दुल करीमखाँच्या गायकीचा प्रभाव उघडपणे दिसत असे. प्रभुदेवांचे छोटेमोठे कार्यक्रमही होऊ लागले.

परंतु प्रभुदेव थांबले नाहीत यात त्यांच्या तडफडीची ग्वाही मिळते. ते प्रयत्न करून व करवून मुंबईस आले. सध्या पं. जगन्नाथबुवा पुरोहितांकडे शिकत आहेत.

गोड आवाज, त्याला स्वराची जोड आणि मेहनतीने







राग गाण्याची वृत्ती यामुळे प्रभुदेवांचे गाणे दिवसेंदिवस रसिकांचे लक्ष वेधून घेणारे ठरत आहे. त्यांचे १९४९ पासूनच आकाशवाणीवर कार्यक्रम सुरू झाले. आज ते आकाशवाणीच्या मान्यवर कलावंतांपैकी एक आहेत. अनेक आकाशवाणी केंद्रांवर म्हणूनच त्याना पाचारिले जाते. संगीत महोत्सव, संगीत संमेलन व संगीत परिषदांतून त्यांच्या गायनाचे कार्यक्रम होत आहेत ही त्यांच्या प्रगत वाटचालीची खूणच होय.

आज प्रभुदेव सरदारांचे गायन ऐकताना दोन गोष्टी जाणवतात. एकतर वेगवेगळे राग तयारीने गाण्याचा त्यांचा कल व मेहनत दिसते. परंतु सुरवातीला मुलाईम व अस्ताईत गाण्याची गळ्याला सवय झाल्याने अजूनही ते पूर्ण खुलून गायल्याचे समाधान श्रोत्याला मिळत नाही. त्यातही कुमार गंधर्वांच्या अतिशय भारदस्त रागदारी गाण्याचे अनुकरण करण्याचा मोह त्याना अनावर होत असल्याचे प्रत्ययास येते. कुमारांची आवाजी, त्यांचे सुरेल चढउतार, तानांची फेक व पलट, रागदारीत लोकसंगीताचे अद्वितीय मिश्रण यानी कुमारांचे संगीताचे रसायन संपन्न व सुंदर बनते. त्याचे अनुकरण शिवधनुष्यासारखे अंगलट येण्याचा धोकाच अधिक असा इशारा मात्र प्रभुदेवाना दिल्याशिवाय राहवत नाही.

आज प्रभुदेवांची तयारी चांगली आहे. बैठक रंगवण्याची व गाजवण्याची क्षमता त्यांच्या ठायी निश्चित आली आहे. स्वतःची मिठ्ठास आवाजी आणि तिच्या वरच्या 'पिच'ला जाणाऱ्या मर्यादा लक्षात घेतल्यास त्यांच्या गायकीस स्वतंत्र वळण प्राप्त करून घेता येईल एवढेच नव्हे तर मलिकार्जून मन्सूर, भीमसेन जोशी, कुमार गंधर्व, जितेन्द्र अभिषेकी यांच्या सारखी स्वर व रागांची विहंगम भरारी संगीतप्रेमीयाना भारून टाकील.

प्रभुदेवानी आपल्या गायकीबद्दल खूपच अपेक्षा निर्माण करून ठेवल्या आहेत आणि यातच त्यांच्या उत्कर्षाचे रहस्य आहे.

●●●











# सकाळी उठोनी नळासी भजावे

'सकाळी उठोनी देवासी भजण्या'ऐवजी आजकाल 'नळासी भजावे' लागते हा मुंबईकरांचा अनुभव! नळ म्हणजे मुंबईकरांचे अक्षरशः 'जीवन'. हा नळ मुंबईकराना केवळ पाणीच देतो (किंवा देत नाही) असे नव्हे; त्यांच्या जीवनाच्या विविधागांना तो स्पर्शून जातो...



**सकाळी** उठल्या-बरोबर मुंबईत इच्छेनं वा अनिच्छेनं ज्याचं प्रथम दर्शन घ्यावं लागतं तो हा मुंबईचा नळ. 'सकाळी उठोनी देवासी भजावे' असं कुणी लाख (खाक) म्हटलेलं असो, मुंबईत जगायचं असेल तर 'सकाळी उठोनी नळासी भजावे.' देवाला नाही भजलंत तरी चालेल. तो दयाळू असतो, तुमची अडचण समजू शकतो. पण मुंबईचा नळ कोणाची दया करीत नाही. हा टायमावर येणार आणि टायमावर जाणार. फारच ड्युटीशील! नोकरशाहीचे सर्व गुण (दुर्गुण!) याने अंगी बाळगले आहेत. याची 'ड्युटी' ठरलेली आहे. ठरलेल्या वेळेनंतर हा येणार आणि ड्युटी संपण्यापूर्वीच पसार होणार. येण्यापूर्वी पंधरा मिनिटं हा आपल्या आगमनाची सूचना दिल्याशिवाय रहाणार नाही. कोणाच्या घरात जाण्यापूर्वी दरवाजा ठोठावण्याची शिष्टसंमत पद्धत हा तंतोतंत पाळतो. येण्यापूर्वी 'सॉऽऽऽ' असा फुत्कार करून सर्व चाळीला 'बा अदब ...निगाह रखो, हम आ रहे हैं।' अशी सूचना देऊनच हा प्रवेश करतो.

येण्यापूर्वी आळोखेपिळोखे देणे, उसासे टाकणे, मध्येच 'कॉक्' करून फुसकारणे इत्यादी सर्व विधी केल्यावरच हा ड्युटीवर हजर होतो. अर्थात् ड्युटीवर हजर झाल्यावरोवर जोमानं कामाला लागणारी ही वल्ली नाही. थोडा वेळ उत्साहात काम केल्यावर त्याचा उत्साह पार मावळतो. अशा वेळी तो इतक्या मंदगतीनं आणि झोपेत काम करीत असतो की, सरकारी हपिसातल्या 'पिऊन'ने त्याच्यापासून धडे घ्यावेत.

मुंबैचा हा नळ महाखटयाळ! ठरलेल्या वेळी न येऊन जमलेल्या प्रेक्षकाना आतुरतेने वाट पहायला लावणाऱ्या 'इंडियन' अध्यक्ष महाशयाप्रमाणं हा आपल्या चाहत्याना तास तास रखडायला लावतो. त्यांच्या तोंडचं पाणी पळून ते डोळ्यात जमा झालं की, हा मोठ्या दिमाखानं गर्जत प्रवेश करतो. पण बऱ्याच वेळा ही केवळ गर्जनाच ठरते. 'गर्जेल तो पडेल काय?' या न्यायानं पाण्याची बोंबाबोंब! आल्यानंतर अगदी मख्ख बनून संथ गतीनं याचं वाहणं चालू असतं. आधीच कंटाळलेल्या बाया याच्या संथपणावर भयंकर चिडतात. पण करतात काय? 'नळावर रुसली ती दिवसभर फसली.' मुंबईतील

अनुक्रमणिका

स्त्रिया नळामध्येच सहनशीलता शिकत असाव्यात.

शहाण्या पुरुषानं स्त्रियांच्या तोंडाला लागू नये म्हणतात व मी मी म्हणणारे पुरुष स्त्रियांच्या पुढे हात टेकतात. पण 'नळ' हा एक असा पुरुष आहे की तो स्त्रियांच्या तोंडालाच काय पण कच्छपी लागलेला असतो. कसलीही स्त्री असो नळ म्हटला की कशी सुतासारखी सरळ येते. जहांवाज स्त्रियाना सरळ करणारा हा पुरुषोत्तम 'नळ' स्वतः मात्र वक्रतुंड आहे. एकाद्या पाताळयंत्री पुरुषाप्रमाणं हा नेहमी अधोवदन असतो. पुरुष असूनही व अनेक तरुण व सुंदर स्त्रिया याच्या भोवती घोटाळत असताना त्यांच्याकडे वाकड्या नजरेनंच काय पण सरळ नजरेनंही पहात नाही. पहायचंच झालं तर खालच्या नजरेनं पहातो. अगदी लक्ष्मणाप्रमाणं हा स्त्रियांच्या चरणकमलांचंच बहुतेक दर्शन घेत असतो. दिसायला मख्ख व जमिनीशी समांतर असलेली दोन शिंगं डोक्यावर वागवणारा हा नळ केवळ 'खालीमुंडी' घालूनच अनेक प्रताप करीत असतो.

भांडण लावणं हा त्याचा एक आवडता छंद. मुंबईतल्या स्त्रियांच्या भांडणाचं नळ हे एक प्रमुख कारण असतं. नळाला हे पूर्ण माहीत असतं. स्त्रियांची भांडणाची ही हौस तो मोठ्या आवडीनं पूर्ण करतो. कजाग बायांची अर्धी मिजास तो आपल्या आगमनापूर्वी तासच्या तास उभ्या करुन उतरवतो व राहिलेली रग आपल्या देखरेखीखाली जिरवतो. मुंबईच्या स्त्रिया आणि चिमुरड्या पोरी भांडणाचे प्राथमिक धडे नळातच नळाच्या देखरेखीखाली घेतात.

प्रेम हे कितीही पाक किंवा पवित्र असलं तरी पोरापोरींच्या खाजगी प्रेमाला बहुतेक सक्त विरोध आढळतो. आपल्या पोरानी 'असले चाळे' करू नयेत म्हणून आई–बाप डोळ्यात तेल घालून जपत असतात. तात्पर्य काय तर आईबापांच्या देखत व विशेषतः चाळीत प्रेम करायला आईबाप या संस्थेचा सक्त आणि कडवा विरोध असतो. अशा वेळी या प्रेमी पोरांच्या मदतीला थोर येणं अशक्यच. अशा दुर्धर प्रसंगी या प्रेमळ पोरांच्या मदतीला कोण येत असेल तर तो नळच होय. प्रेमिकांच्या मनात उसळलेल्या आगीच्या डोंबावर चार शितोडे कोण टाकीत असेल तर तो नळ. झुरणाऱ्या मनातील कढ आणि उसासे पाहून पत्थरालाही पाझर फुटावा मग नळाला पाझर फुटल्यास नवल ते कोणते ?

या दृष्टीनं चाळीतल्या चंपी, झब्बी, नाऱ्या, छोटचा इ.पोरांच्या प्रेमाला त्यातल्या त्यात सुरक्षित व सोईची जागा म्हणजे नळच. या प्रेमिकांबद्दल या नळाच्या मनात (खरं म्हणजे शरीरात) अपार ओलावा असतो. चाळीतला हा सार्वजनिक नळ बहुतेक एका टोकाला असतो. अशा नळाला

## ग. वि. साळवी

प्रकाशाचं बहुतेक वावडं असतं. प्रेमाचं पण तसंच असतं. चोरटं प्रेम हे चाळीच्या एका टोकाला नळात व अंधारात विशेष फोफावतं. नळाच्या पाण्यावर ते चांगलंच पोसतं. अशा नळात बऱ्याच वेळा बत्ती नसते. असल्यास फारच मंद. चाळीच्या मालकानी लावलेले बल्बही बहुतेक अल्पायुषी असतात. एकदा ते संपले की नवा येईपर्यंत आठवडा सहज जातो.

अंधार असो वा नसो नळ ही निर्धास्तपणे भेटण्याची जागा असते. संशयाला जागा नाही. मुंबईच्या जीवनात बसस्टॉप व नळ या निश्चितपणे तासच्या तास घालवण्याच्या जागा होत. बसच्या नावाखाली तासच्या तास आपल्या इच्छित 'वाहनाची' वाट पहाता येते. नळाचंही तसंच असतं.

चंपी नळात गेली की छोटचाला उकाडा होऊ लागतो व तो 'आंघोळीच्या मिषाने' नळात घुसतो व त्या 'जीवनधारेत' यथेच्छ डुंबतो. ऐन थंडीच्या मोसमातही मग त्याला थंड पाण्याने स्नान केल्याशिवाय 'फ्रेश' वाटत नाही. चंपीचंही तसंच. छोटचाची आंघोळ संपेपर्यंत हिचं धुणं आटपत नाही. छोटचा अंग चोळीत (वास्तविक हात चोळीत) असतो तर चंपी परकराला उगाच साबण चोळीत उगाच फेस काढीत बसते. इथं त्यांच्या मूक प्रेमाला चांगलाच फेस येतो. एखादे वेळी चंपीच्या बापाच्या ध्यानात ही गोष्ट आल्यास परकराऐवजी तोंडाला फेस येण्याची शक्यता गृहीत धरलीच पाहिजे. पण प्रेमासाठी एवढी कुर्बानी दिलीच पाहिजे.

चाळीतील सार्वजनिक नळात अदलाबदल नेहमीच होत असते. (यात प्रेमाची अदलाबदल आलीच.) विशेषतः कपडे, वाटचा, चमचे यांची अदलाबदल नेहमीच चालते. मुख्यतः स्टीलच्या छोटचा भांड्यांची अदलाबदल व गडपागडपी खास होते. सर्वांची भांडी व कपडे एकदमच नळात येत असल्याने ही अदलाबदल अपरिहार्य असते.

काही चतुर गृहिणी या संधीचा फायदा उठवतात. आमच्या शेजारच्या नकू आत्या महा विलंदर बाई ! आपली फुटकी जर्मनसिल्वरची भांडी, जुन्या चड्डचा, फाटक्या बॉडचा इत्यादि गोदावरीबाई किंवा येसू मावशी यांच्या भांड्यात किंवा कपड्यात बेमालुमपणे घुसडून देतात. त्या बिचाऱ्या गर्दीत अवधान न राहून ती भांडी व कपडे धुवून घेऊन जातात. मग अर्ध्या तासानं नकू आत्या मोठ्या साळसूदपणे 'अहो, माझा जर्मनसिल्वरचा टोप आला का हो तुमच्या भांड्यातून ?' किंवा 'अहो मावशी, आमची एक बॉडी आली आहे का पहा हो तुमच्या कपड्यातून.' असं विचारीत आपली भांडी व कपडे परत घेऊन येतात. वरं फुटकी भांडी व जुने कपडे गडप होण्याची शक्यता कमी. तात्पर्य काय सार्वजनिक नळाचा हा फायदा काहीजणी घेत असतात.

अशा नळात जायचं म्हणजे स्वतःची बादली, साबण, राख इत्यादी वस्तू



अनुक्रमणिका

घेऊन गेलंच पाहिजे असं नाही. (भांडी व कपडे मात्र स्वतःचेच न्यायचे असतात) नळात या वस्तू हमखास कोणाच्या तरी लाटता येतात. आमच्या चाळीतल्या सोनूताईनी गेल्या दहा वर्षात नळात कधी बादली नेलेली मला आठवत नाही की मूठभर राख नेण्याचे कष्ट घेतलेले नाहीत. साबणाची तीच गत. कोणाकडील साबण पाहिजे असेल तर, 'काय मेली माझी आठवण तरी, धुवायला आले आणि साबण घरीच विसरून आले. शांताबाई, वघू हो तुमचा साबण जरा. एकच पोलकं आहे.' असं म्हणून त्या शांताबाईच्या शांत व सहनशील स्वभावाचा फायदा घेतात व त्यांचा साबण उपटतात. आणि तो सर्व कपड्याना लावून छोटी वडी हातात देत वर सल्ला देतात, 'शांताबाई, हा बगळा छाप सावण फारच संपतो बाई. त्यापेक्षा तुम्ही पाचशे एक कां नाही वापरत ? हां ! याचा फेस मात्र फार चांगला येतो हं.' शेवटचं प्रशस्तीपत्रक देऊन नळभर पसरलेल्या शांताबाईकडच्या सावणाच्या फेसावर त्या पांघरूण घालतात.

नळ ही वास्तविक स्वच्छतेची जागा. पण जगाची स्वच्छता करणारा हा नळ स्वतः मात्र वर्णनाच्या पलीकडे असतो. अगदी बटाटयाच्या सालीपासून माशाच्या काटयांपर्यंत आहारशास्त्रातील घटकद्रव्यांचे अवशेष याच्या प्रांगणात इतस्ततः विखुरलेले असतात. आज सामान्य माणसाच्या जीवनात 'चौरस आहार' हे एक स्वप्नच राहिलेलं असलं तरी चौरस आहाराचं दर्शन नळात हमखास घडतं. महायुद्धापूर्वी या नळात भातही पेरला जात असे. परंतु शिजलेला तांदुळ रुजत नसल्यानं नळात तांदळाचं उत्पादन झाल्याचं ऐकिवात नाही. आज ते दृश्य नळात दिसत नसलं तरी कुत्र्यामांजराना पोसण्याची नळाची ऐपत कमी झालेली नाही.

माणसाच्या वाट्यास न येणारा चौरस आहार याला सदोदित मिळत असल्याने हा उपाशी तर कधी नसतोच उलट सदा भरलेलाच असतो. अति आहारामुळं याला मधूनमधून अजीर्ण होतं व पोटही फुगतं. मग मात्र याच्या जवळ जाणं हे मोठंच दिव्य असतं. पण गरजवंताला अक्कल नसते आणि 'नाक'ही नसतं. नळाचं दर्शन घेतल्याशिवाय जगणं कठीण असल्याने त्याही अवस्थेत चाळीत रहाणारा मानव नावाचा जंतू त्या नळात डुंबत असतो.

'संप' आणि 'बंद' ह्या मुंबईच्या जीवनातील नित्याच्या बाबी होत. नोकरशाहीच्या अनेक गुणाबरोबर नळाने हाही गुण उचलला आहे. यालापण संपावर जाण्याची मधूनमधून हुक्की येते. एकाद्या दिवशी हा नोटीस न देताच संपावर जातो. नळाचं पाणी गेलं की मुंबईकरांच्या तोंडचं पाणी पळतं. नळाचं आगमन झाल्यापासून मुंबईतील बहुतेक विहिरी गडप झाल्या आहेत. त्यामुळं नळाचा संप म्हणजे कोयनेच्या भूकंपाइतकीच किंवा चिनी आक्रमणाइतकीच मुंबईकराना धक्का देणारी गोष्ट आहे. त्यामुळं नळाचं पाणी गेलं की हातात मिळतील ती भांडी घेऊन लोक रस्तोरस्ती पळत असतात. शेजारच्या चाळीतून किंवा शेजारच्या भागातूनही पाणी आणावं लागतं. रस्त्यावरचं ते दृश्य मात्र हृदयाचं पाणी करणारं असतं. स्त्रिया–पुरुष–मुलं सर्वच भांडी घेऊन पळत असतात. फोर्टमधील कडक इस्त्रीला जपणारा क्लार्क किंवा हपिसातील कॅबिनमध्ये पंख्याखाली बसून हाताखालच्या लोकाना फटकारणारा हफिसरसुद्धा हातात बादली घेऊन आपल्या पोझिशनचा विचार न करता रस्त्यानं उमेदवारी करीत असतो. ते दृश्य पाहिलं की नळाच्या अंगी किती 'पाणी' आहे याचा अंदाज येऊ शकतो.

हा बहुतेक तळमजल्यावर ठाण मांडून असतो. याला 'लो ब्लडप्रेशरचा' (वॉटरप्रेशरचा) रोग असावा. तो फारसा वर चढत नाही. चढलाच तर पहिल्या किंवा दुसऱ्या मजल्यापर्यंत. बस ! त्याच्यावर चढणं त्याच्या प्रकृतीला बहुतेक परवडत नाही. तळ मजल्यावरून चौथ्या-पाचव्या मजल्यावर पाणी चढविणाऱ्या भगिनींच्या दुर्दैवाची कहाणी त्याच जाणोत. पण एवढ्यावरच भागेल म्हणता ? मग तो नळ कसला ? वरच्या मजल्यावरून नळाला पाणी पाहून मोठ्या आशेनं बादली घेऊन खाली धावत यावं, मोठ्या उमेदीनं नळाला बादली लावावी आणि त्याच वेळी त्यानं काळं करावं हा अनुभवही मुंबईकराना नवा नाही. पण जळफळण्यावाचून करणार काय ? कामावरून दमूनभागून यावं तर प्रथम याची आर्जवं करावी लागतात. हा प्रसन्न असला तरच चूल पेटायची आणि चूळही भरणं शक्य व्हायचं.

रस्त्यावरील सार्वजनिक नळ हा मुंबईतील याचा दुसरा बंधू. हल्ली याचं दर्शन क्वचितच होतं. फारच थोड्यांच्या अंगी 'पाणी' उरलं आहे. बाकीच्या ठिकाणी पाण्याचा ठणठणाट ! बहुतेक याचं थोबाड फुटलेलं, अर्थात् मुखवटा कोणी तरी चोरलेला आढळेल. एके काळी येणाऱ्या जाणाऱ्या नवख्या पांथस्थाला पाणी पाजून त्याचा आत्मा शांत करण्याचं पुण्यकृत्य हा करीत असे. त्याच्या शेजारी एखादी दगडी किंवा सिमेंटची टाकी पाण्यानं भरलेली दिसायची आणि तेथे एखाद्या टांग्याचा घोडा किंवा खटाऱ्याचा बैल पाणी पिताना आढळायचा. आता टांगे गेले, बैलगाड्यांचा काळ संपला. त्याचबरोबर रस्त्यावरचे सार्वजनिक नळ व पाण्याचे हौदही नाहीसे झाले आहेत. आता तिथं म्युनिसिपालटीची कचऱ्याची गाडी उभी असलेली दिसेल.

रस्त्यावरील हे सार्वजनिक नळ अदृश्य झाले असले तरी चाळीचाळीतील सार्वजनिक नळ मात्र आजही आपलं अस्तित्व टिकवून आहेत. नळाचं पाणी हे मुंबईचं वैशिष्टच. मुंबईतील या सुखसोयीबद्दल खेड्यापाड्यातील लोक मुंबईकरांचा हेवा करीत आले आहेत. पण ते पाणी मिळवताना मुंबईकरांचे होणारे हाल अनुभवण्याकरिता मुंबईकरच व्हायला पाहिजे.

●●●

**अजय** टेबलावरील फापट-पसाऱ्यात बुडून गेला होता. अनिता पलंगावर पाय पसरून उशी मांडीवर घेऊन फुरंगटून बसली होती.

"अ ऽ ज ऽ य !" तिने निर्वाणीच्या सुरात हाक मारली. "आता मात्र मी साफसाफ सांगते हं ! मला कंटाळा आला आहे. सुटीच्या दिवशी कसले मेले ते काम काम आणि काम ! छप्पनदा मेले ते फोन आणि आलेगेले कोणकोण. त्या फोन इतकीसुद्धा किंमत उरली नाही ना आम्हाला ?"

"हॅलो ऽ डार्लिंग !" अजय म्हणाला. "दिली की नाही फोन-इतकी किंमत ? हे खदिरांगारलोचने ! हा केशपाश मुक्त सोडून तू क्रोधागारात जाऊन बस कशी—हा मी आलोच, बघ—" तो उठत उठत हसत म्हणाला.

"इतका कंटाळा येतो की नाही अजय घरात बसून ! तुझ्या ऑफिसातली लायब्ररियनची पोस्ट मला दिलीस नं, तर आणखी एका जन्माची ऋणी होईन मी तुझी—अगदी आण-खीन् एकदां माळसुद्धा घालीन !"

"म्हणजे ही करमालाच नं ! वा वा वा ! केव्हाही ! बंदा हाजिर है !"

"आता उगीच विषय बदलू नकोस हं ! मी काय म्हण-तीय् ? . . ." गाल फुगवत अनिता म्हणाली.

# अनाजकली

सौ. अंजली ठकार



"त्या भुक्कड नोकरीचेच ना ?" अजय जोरात म्हणाला. "नो नो नो ! त्रिवार नो ! जरा मजा करू या वर्षभर तरी. आताशी कुठे लग्नाला चार महिने होतायत्. अशा कशा ग तुम्ही हल्लींच्या मुली अना ! मंगळागौरी, गौरीगणपती, सणवार, डोहाळजेवणी, बारशी, सत्यनारायण . . . कशाकशात म्हणून तुम्हाला रसच राहिलेला नाही. आई असती ना आज, तर तिने केव्हाच सत्यनारायण घातला असता आपल्या लग्नाचा."

"ई ऽ ऽ ! सत्यनारायण !" अनिता किंचाळून म्हणाली. "पूजेला बसलेले तू आणि मी ! हायहाय ! बेफाम विनोदी दृष्य ! गळेकाढू हिंदी गायकाने सोवळे मराठी भक्तिगीत गावे तसला धेडगुजरी प्रकार . . . तू मला लौकर लौकर नोकरी करू दिलीस नं, तर घालीन हो मी देखील सत्यनारायण !"

"गुळाच्या ढेपीवर माशा घोंगावतात तशा सगळ्या पोरी नोकरीसाठी धडपडत असतात नुसत्या ! आणि अना, नोकरी करायची ना तुला, तर आमच्या ऑफिसात नको बुवा ! म्हणजे मग आमचे अस्तित्वसुद्धा कुणाच्या खिजगणतीत नाही राहा-यचे. तुम्ही बायका म्हणजे लिफ्टमधून एकदम पाचव्या मजल्या-वर जावे तशा डोक्यावरच चढून बसता. ऑफिसातले आमचे डेसिग्नेशन काय, तर अमक्या तमक्या चटक–चांदणीचा नवरा ! छे छे बुवा ! आपल्याला तर कल्पनासुद्धा सहन होत नाही."

"प्रतापराव आहेस नुसता ! हे तुझे प्रताप माहीत असते तर—"

"तर मलाही हा ताप नसता सोसावा लागला !" अजयने हसत हसत तिचे वाक्य पुरे केले. "जाऊ दे ग ! ए, इकडे बघ ना माझी अनारकली ! तू जेव्हा सुगरणीसारखा चौरस सैपाक करू लागशील नं, तेव्हा आम्ही तुला 'अनाजकली' हा किताब बहाल करणार आहोत. म्हणजे आपली ती अन्नपूर्णा—हातात पळी घेतलेली !"

अजय तिच्याजवळ बसत तिला चिडवत म्हणाला, "त्याचे काय होते, पूर्वीच्या बायकाना स्वयंपाकघरात भयंकर कामे असत. त्यामुळे त्याना कंटाळा मुळी कसा तो येतच नसे !"

"पुरे, पुरे—" अनिता चिडून म्हणाली.

**अनिता म्हणजे अत्याधुनिक, सुंदर, पदवीधर तरुणी ! अजयची तर ती 'अनारकली' होती, पण तिनं 'अनाजकली'ही व्हावं अशी त्याची धडपड होती. त्यातूनच उद्‌भवलेले हे विनोदी प्रसंग . . . . .**





अनुक्रमणिका

"कां—पुरे पुरे कां—बोल बोल ! या बशीतल्या चिवडयाची शपथ घेऊन सांग. एकतरी पदार्थ नवऱ्याच्या मदतीशिवाय पार पडला आहे का तुझा ! बोल प्रिये बोल ! या अजयजवळ पराजय कबूल करण्यात लाज ती कसली ?"

"इश्श्य—पराजय कसला त्यात ! सैंपाकीण होण्याची अॅंबिशन नव्हती तुझ्याशी लग्न करताना माझी ...."

"पण आज संध्याकाळी काय बेत आहे ?—हे वघ पिठलेभात आणि ब्रेड ऑमलेट सोडून काहीही कर बुवा !!" आणि मनाशीच पुटपुटत पुढे अजय म्हणाला, "म्हणजे काय—हे सोडून म्हणजे बाहेरच जायला हवे जेवायला ! कारण ते सोडून काहीही करायचे. म्हणजे....अनिताबाईंच्या हाताला हात लावा—सैंपाकघरात जाऊन !!"

"मग काय झाले रे मदत केली म्हणून—तुला येतेय् सगळे. एकदा मला यायला लागले म्हणजे कशाला तुझी एवढी खुशामत ...."

अजय लांबलचक जांभई देऊन म्हणाला, "एकदा ! ... माय गॉड ! एकदा .... म्हणजे युगामागुनी युगे लोटल्यावर !"

"हे रे काय अजय—सारखी चेष्टा न् टोमणे. सारा जन्म आमचा हॉस्टेलमधे गेला—मग आम्ही तरी काय करणार ?"

"आणि माझा हॉटेलमधे जाणार !—"

"हो तर तर ! लग्नाच्या आधी हॉटेल कसे ते माहीतच नव्हते जसे तुला ! खरंच अजय—" सावरून बसत अनिता म्हणाली, "तुझ्या आईला स्वयंपाक यत नव्हता का रे ?"

"वा वा ! हे काय बोलणं ! बिचारी स्वर्गी सोन्याची झाली –"

"नाही ... मग तुला कशी इतके सगळे करायची सवय लागली रे ?"

"हॅं : ! ते काय आपलं—हौस ... छंद ... हॉबी. म्हटलं, नापास-बिपास झालो तर साईड बिझिनेस असावा हाताशी ! पण बरं का अना, आई अशी झक्क सैंपाक करायची म्हणून सांगू—तू तर एकदम खूष झाली असतीस."



यंदा नारळीपौर्णिमा अशी साजरी झाली !

"छे : ! पण मग मी मुळी तुझ्याशी लग्नच केलं नसतं. आई असलेल्या मुलाशी लग्नच करायचं नाही असा पणच होता मुळी माझा. अहो, सासू आणि आसू—आणि आसू म्हणजे नका पुसू !"

"वा ! म्हणजे प्रेम करतानासुद्धा तुम्ही बायका भाजी घेण्याइतका चोखंदळपणा करता ! प्रेम करता ते सुद्धा इतक्या सावधपणे हं !"

"बेसावध राहून कसं चालेल बाबा ! दावणीला बांधलेल्या गाईसारखं... निमूटपणे ... "

"म्हशीसारखं तरी म्हण ! अग अग म्हशी मला कुठे नेशी म्हणत आम्हीच येतो मग तुमच्या मागोमाग. कां अगदी मारक्या म्हशीसारखी बघतीयस् शिंगं रोखून ? मला तर वाटतं अग—जुन्या पद्धतीच्या लग्नात प्रथम घाणा भरतात ना—योग्य ! अगदी अॅप्रोप्रिएट ! पुरुष घाण्याला जुंपला जाणार हेच त्यातून सूचित केलं जात असावं ! —काय ! केला की नाही शेवटी अजयनेच पराजय ?"

"पराजय म्हणे पराजय ! " अनिता वेडावून म्हणाली, "मुळात मुळी तुझं नांवच चुकीचं ठेवलंय्, अजय—म्हणजेच ज्याला कधीच जय मिळत नाही, तो ... अजय नाही काही ... अजेय पाहिजे अजेय ... "

"आईच्या वतीने मी माफी मागतो हं बाईसाहेब ! सरकारानी कसुरीची माफी करावी—पाळण्यात नाव ठेवताना अज्ञ असलेल्या या बालकाला ! तू आता नवे नांव ठेव ना माझे. अजेय ठेव वाटल्यास अजेव ! म्हणजेच जो कधीच आयते जेवत नाही तो !"

"चल—पुरे आता चावटपणा" अनिता उठत म्हणाली. "जाऊ या की जरा बाहेर—ट्रॅन्झिस्टर घेऊ या का रे बरोबर ? बसू या निवांत जाऊन कुठेतरी !"

"नको नको—" अजय घाबरल्याचा देखावा करीत म्हणाला. "एक माझा गळा धरलास तेवढा पुरे आहे. त्या गायक-गायिकांचे गळे धरून त्याना आता आणखी कुठलीकुठली हवा खायला लावणार आहेस ? मला तर बुवा ट्रॅन्झिस्टर हातात घेऊन बाहेर निघाले की दोन बोटांच्या चिमटीत मांजरच धरल्यासारखे वाटते ... "

"से येस् ऑर नो ! किती पाल्हाळ लावायचा प्रत्येक गोष्टीत !"

—हायहील्ड स्लिपर्स घालून नाजुक लयीत अजयबरोबर चालताना पिंगपाँगच्या बॉलसारखी ती हलकीफुलकी, तरल दिसत होती. रस्त्याने दर पाच मिनिटानी तिला मित्र किंवा मैत्रिणी भेटत होत्या, आणि मग खिकाळण्याच्या व लाडेलाडे कुकूचकूचा कार्यक्रम होत होता. एकदा चिडून अजय म्हणाला, "अना काय हे—एक वाक्य सुद्धा तुझे हे मित्र पुरे होऊ देत नाहीत. एक गेला की दुसरा ... तिसरा ... अगदी डासांसारखे गुणगुणत असतात आपल्याभोवती —"





"इश्श्य ! कसली मेली ही उपमा . . . तुमच्या या 'मत्सर'–दाणीला काही दाद नाही द्यायचे हो पण हे डास !"

—एकदा तर फारच गंमत झाली. अजयने त्याच्या एका मित्राची आणि तिची ओळख करून दिली. दोघांनीही औपचारिक नमस्कार केला आणि मग नाटकीपणाने दोघेही हसले. अनिता हसतहसत म्हणाली, "आम्ही चांगलेच ओळखून आहोत हो एकमेकाना ! एका नाटकात हे माझे सासरे झाले होते."

"अच्छा अच्छा—" अजय चेष्टेने म्हणाला. मग सूड म्हणून तू त्याला जेवायला बोलाव ना आपल्या घरी ! तिखटजाळ आमटी नि खारट भाजी—खास अनिताफेम फोमरवर पोळचा !"

"असू दे हो ! भर रस्त्यात निदान अन्नब्रम्हाला स्मरून तरी तोंड आवरा ! . . . "

चालता चालता अजय सांगू लागला, "त्या तुझ्या सासऱ्याबरोबर तो माझा मित्र होता न अना, तो थोडासा लेखक आहे वरं का ! आहे तसा ॲनिमिक कविप्रकृतीचाच, पण कधीकधी कॅल्शियमचे इंजेक्शन दिल्यासारखे गरमागरम खेळवून जातो क्षणभर."

"बापरे ! —" अनिता चीत्कारली. "लेखक ! म्हणजे स्वतःचे आणि दुसऱ्याचे मेंदू पोखरणारा उंदीरच !"– मांजरीसारखे फिस्कारून ती पुढे म्हणाली, "लेखकपणाचा वास वाकी मारतच होता बरं का त्याच्या वोलण्याला. तुमच्यासारख्या चौकसांचेच जमायचे असल्या तिरकसांशी !"

"वा वा ! वाटेल ते बोलू नकोस हं उगीच. रविवारी तो जेवायला येणार आहे आपल्याकडे. आणि एकदाच ओझरते पाहून काय हवे ते वरळते आहेस."

"एकदाच काय, दहादा पाहिला तरी मी तेच म्हणणार. अहो येवढच काय घेऊन वसलात, साध्या बोलण्याचालण्यातल्या लकबींवरून तो माणूस मला आवडतो किंवा नावडतो. माझ्या आईची एक मैत्रीण आहे वरं का—सगळी छान, सुरेख, सुग्रण . . .पण नेहमी बोलताना 'मी बाई तिला अशी सल्ला दिली' म्हणते, किल्लीला चावी म्हणते, अन् कपाटाला म्हणते अलमारी– म्हणून ती मला मुळीच आवडत नाही. 'सल्ला' हा जबरदस्त पुरुषी शब्द चक्क स्त्रीलिंगी वापरायचा म्हणजे काय ? उद्या 'नवरा' या शब्दाचाही कुणी असला खेळखंडोबा करील !"

"उद्या ! आज म्हण आज !!"— अजय विनोदाने ओरडून म्हणाला. "नाही; पण तुला बराच अभिमान दिसतोय् 'नवरा' या शब्दावद्दल ! अगदी कल्पनातीत !!"

—घरी येताना अनितेला काही सुचत नव्हते. दोन मित्र एकदम जेवायला येणार म्हणून धसक्यानेच तिचा पार धुव्वा उडाला होता. खरे म्हणजे तिला वाटत होते, एखाद्या आलीशान हॉटेलात त्या मित्राना खाना द्यावा. पण अजयचाच हट्ट होता. घर मांडल्यापासून घरी तसे कुणीच फारसे आले नव्हते. आणि असे कोणीतरी पैपाहुणे जेवून गेल्याशिवाय अनितेचा सुग्रणपणा तरी कसा कळावा ?

अजय तिची गंमत बघत होता. तो म्हणाला, "हे बघ, या-वेळी मात्र मी तुला मुळीच मदत करणार नाही हं! अगदी गळ्यात पडून आर्जवे केलीस, लाडीगोडी लावलीस, खसखस, किसकिस, वसवस, धुसफुस केलीस तरी—"

"काय हो—आहे काय त्यात! पहाटे उठेन—समजलास! पण काय काय करायचे ते मात्र सांगून ठेव हं! आणि आणून दे सगळे. बाजारात तर हिशेब करता करता माझा जीवच उडून जातो. अगदी गणिताच्या पेपरासारखा."

अजय म्हणाला, "शिरा—भजी—मसालेभात—पचडी—लोणचे—पापड—असा अगदी साधा बेत करू वाटल्यास!"

"हा साधा बेत ना अजय! काय माझी चेष्टा करतोस लांबलचक यादी करून . . ."

"हें:! त्यात काय लांबलचक—दिसायला वेणी लांबलचक दिसावी आणि आत बाजारू गंगावन असावे तशीच आहे बघ ही यादी. बघ—पापड, आयते! लोणचे, आयते! भजीपीठ, आयते! म्हणजे फक्त मसालेभात, पचडी आणि शिरा हाच खरा सैंपाक. आहे काय त्यात—आणि त्याला पहाटे कशाला उठायला हवे?"

"फक्त गडे पण एकदाच सांगा—मी आधी यातला कोणता पदार्थ करू? म्हणजे जरा सोपे जाईल हो!"

"सांगू? सर्वात आधी मला उठव—म्हणजे छान जमेल बेत!"

"तसे नाही गडे—यावेळी खरेच हौसेने मीच एकटी करणार!"

—चहा करता करता पुन्हा तोच सुसंवाद चालला होता. "त्यात काय ग—येईल सगळे. केल्याने होत आहे रे—जात्यावर बसले की ओवी येते. आणि डायनिंग टेबलावर बसले की डबे उघडता येतात. आणि हे बघ—पहिली गोष्ट म्हणजे दळण-बिळण आणून ठेव मोलकरणीकडून. जळण संपले हे एक अगदी चुटकीसरशी या कानाचे त्या कानाला फोनवरून सांगता येते. तशी दळणाची नाही झाली सोय लेकाची—"

तेवढ्यात गॅस संपला. तो तिच्याकडे पाहून नाटकीपणे म्हणाला, "ते आधण आता माझ्या टाळक्यावर ठेव — मस्त उकळेल. अगं त्या सिलिंडरातच नाही तर बर्नरात येणार कोठून?"

अनितेला हसू फुटले. तो रविवार एखाद्या परीक्षेसारखा तिच्या डोक्यात नाचत होता. "खरच अजय—पण पहिल्यांदाच तुझे मित्र जेवायला येणार आहेत आपल्याकडे."

"हो हो!" अजय म्हणाला, "मित्रही पहिल्यांदाच, आणि आपल्याकडेही पहिल्यांदाच, पण ते मात्र कुठे ना कुठे जेवत आले आहेत बापडे आजवर आयुष्यात!"

"पुरे रे तुझ्या पांचट कोट्या—तेव्हा आपण की नाही—फ्रुटसॅलडच करू या का?—"

"समजला—समजला तुझा कावा. म्हणजे शिरा सफाईने टाळून त्यातून सहीसलामत सुटका! पण म्हटलं बाईसाहेब! पुऱ्या कराव्या लागतील मग पुऱ्या!"

"बरं बरं करीन. फळं मात्र मस्त चिक्कार सकाळी आण हं! चिक्कू, द्राक्षं, संत्री, आंबे, अननस, सफरचंद . . ."

"आणि हे आमचं अनार आहेच—सुंदर सुंदर–टपोरं—दाणेदार . . ."

"ए चल—आचरटपणा पुरे हं! —"

—आणि मग एकदाचा तो सुप्रसिद्ध रविवार उजाडला. अनिताची उठल्यापासून सैंपाकघरात खुडबुड लुडबुड चालली होती. अजय मुद्दामच उठला नाही. किलकिल्या डोळ्यानी तो तिची गंमत पहात होता. फ्रुटसॅलड फक्त त्याने करायचे असा ठराव मंजूर झाला होता. मसालेभाताचा किंचित् करपट वास सुटला होता. पुऱ्यांची सैल झालेली कणीक घट्ट करताकरता अनितेला घाम फुटत होता.

फ्रुटसॅलडचे काम संपवून अजय हसू दाबीत उभा होता.

"प्लीज—प्लीज अजय—" रडकुंडीला येऊन अनिता म्हणाली. "बारा वाजायला आले की रे! तू पुऱ्या लाटून दे ना. गोलगोल—म्हणजे भराभर फुगतील. मी तळते छानपैकी."

तेवढ्यात दारावरची बेल खणखणली. विस्फारलेल्या डोळ्यानी अनिता वेंधळ्यासारखे पहातच राहिली. दारात दोघे मित्र उभे होते. खिदळत एक म्हणाला, "लेका अजा—ही तुझी बेल केव्हाची बकरीसारखी बें वें करते आहे. काय करतो आहेस काय आत बसून एवढं तनमन वाहून—"

अजय त्याला टाळी देत म्हणाला, "हेच ते आपलं—जे चार लोक करतात ते—म्हणजे आपलं . . . को–ऑपरेशन, हेल्प, स्त्रीदाक्षिण्य, वगैरे." बोलतबोलत सगळेच टेबलाभोवती येऊन बसले. अनितेने झटपट पदराने तोंडावरचा घाम पुसला, आणि हसून तने त्यांचे स्वागत केले. अजय पुढे झुकून म्हणाला, "हे बघा वत्सानो! आम्ही दोघे मिळून आता गरमागरम पुऱ्या करतो. मात्र तुम्ही सपाटून जेवायचे हं! बघू या काँपिटिशन—आम्ही दमतो. की तुम्ही दमता!"

नाटकात पूर्वी तिच्या सासऱ्याचे काम केले होते तो मित्र 'आले लक्षात'च्या थाटात हसून म्हणाला, "हे बघ अजय, तसले काही चालणार नाही हं! आपण चौघानी बरोबर जेवायचे. बरं का वहिनी, या अजाला पोळी आणि आम्हाला टाळी चांगली वाजवता येते. तेव्हा तू, अजय, भलीमोठी पोळी लाट एक. आम्ही वाटीने पुऱ्या कापतो. आणि वहिनी तळतील—"

आणि चष्म्यातून रोखून पहात नाटकीपणे नाकात तो म्हणाला, "कशें सूनबाई! पटतें ना?"

पूर्वीच्या नाटकातलेच ते वाक्य ऐकून अनितेला खुदकन् हसू आले.

दुसरा लेखक मित्र हसतहसत अजयला म्हणाला, "आता मात्र अगदी ढेरी पंक्चर होईपर्यंत जेवणार हं! ज्याची लाटावी पुरी, त्याची ओरपावी करी! . . ."

●●●









**एकजुटीने संकटावर मात करु !**

प्रसिद्धि संचालक, महाराष्ट्र शासन, मुंबई.











# मरण दार ठोठावत आहे

प्र. ना. शेणई



[ थेऊर. श्री गजाननाचं मंदिर.
आतील सदरेचा दर्शनी भाग.
समोरच गाभाऱ्यात प्रवेश करण्यासाठी दरवाजा.
ठराविक जागी टांगलेली झुंबरे.
मंचक. व्याधीमुळे गलितगात्र झालेले श्रीमंत थोरले माधवराव पेशवे त्यावर पडले आहेत. निःस्तेज झालेला चेहरा.
शेजारीच रमाबाई बसल्या आहेत. मनात उठणाऱ्या काहूरांचं प्रतिबिंब त्यांच्या चेहऱ्यावर उमटलं आहे. एका अनामिक विचारात त्या गुंग झाल्या आहेत. अगदी आजुबाजूच्या अस्तित्वाची त्याना जाणीवहि नसावी.
माधवरावांच्या नजरेसमोर हेलावत आहे एक स्वप्निल सृष्टी. त्यात ते विरघळताहेत, तसतसे त्यांच्या चेहऱ्यावर कधी हर्षाचे तर कधी खेदाचे, त्वेषाचे भाव उमलताहेत. उठणाऱ्या वेदना ते क्षणभर विसरले आहेत. पण वेदनांची छटा मात्र त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट उमटली आहे.
दुसऱ्या प्रहरचा उत्तरार्ध.
कां—कोण जाणे ते हर्षभरीत होतात. ओठावर शब्द झुकतात. ]

**माधवराव** —वीर ते वीर ! त्यांच्या आयुष्याला दुसरी उपमाच देता येणार नाही.

**रमाबाई**—(सजग होत.) अं—आपण काही म्हणालात ?

**माधव** —हो. म्हणालो खरं. फक्त आमच्यासाठी !

अनुक्रमणिका

**रमा** — आमचं लक्ष नव्हतं. चुकलो आम्ही.

**माधव** — कशाला गोळा केलेत अश्रू डोळ्यात ? किती आसवं ढाळणाराहात आमच्यासाठी ? किती दुःख करणाराहात या नश्वर देहासाठी ? अशा जळण्या–विझवण्यात का गुलाबी आयुष्याचा फुलोरा कोमेजून टाकणाराहात तुम्ही—सिर्फ आमच्यासाठी !

**रमा** — तुमच्या चरणासाठी अशा जळण्यात आयुष्य कोमेजून जाणार असेल, तर आम्ही नशिबाच्या थोर समजू. जीवनाचं सार्थक झालं असंच वाटेल आम्हाला. परमेश्वरानं आम्हाला तुमच्यापासून कधीच दूर लोटू नये.

**माधव** — रमा, तुमच्यासारख्या पत्नी लाभायला गाठीशी साता जन्मीचं पुण्य असावं लागतं. पण आम्ही कुठंतरी उणे पडतो आहोत. . . तोकडे पडतो आहोत.

**रमा** — नाही, नाही. असे अपशब्द . . . भलतंच काही . . .

**माधव** — रमा, रमा !

**रमा** — घडीभर सहवासात देखील साता जन्मीचं नातं जखडलेलं असतं. अं—आपल्या डोळ्यात पाणी ?

**माधव** — अंतरात कुठंतरी कुजबूज उठते आहे— 'माधवा, तू दुर्दैवी आहेस रे . . . अभागी आहेस तू —'

**रमा** — काहीतरी मनाला लावून घेऊन हळहळत राहाण्याची सवय आहे तुमची. तुम्हाला अभागी कोण म्हणेल ?

**माधव** — दुसरं कोण ? आमचा नियंता ! मराठेशाहीचे आम्ही पेशवे असलो तरी नियंत्याच्या दरबारात एक दुर्दैवीच आहोत. आम्ही राज्याचे स्वामी नव्हे—स्वामी तो आहे. आम्ही फक्त दोन, रंक आणि अनाथ ! घडीभर अंधेर आणि घडीभर उजेड यांची गोळाबेरीज म्हणजे मानवी जीवन आहे, रमा ! त्यासाठी असं डोळ्यात पाणी आणणं रास्त नाही. (ठसका.)

**रमा** — ( घाबरून ) अगबाई ! कुणी आहे का . . . .

**माधव** — घाबरू नकोस रमा, सारं ठीक आहे. गजानन . . . गजानन . . . ( कळा. ) आई ग . . . वेदना साहवत नाही, रमा !

**रमा** — आम्ही वैद्यराजाना बोलावणं पाठवतो.

**माधव** — नको रमा, फारा दिवसाचे नव्हेत आम्ही—

**रमा** — ( शहारून) असं बोलायचं नाही. कसा थरकाप होतो आमच्या मनाचा.

**माधव** — एवढं मृत्यूचं भय वाटतं, रमा ? एवढ्या पोथ्या, पुराणं, गाथा वाचून, जपताप करवून अखेर हेच समजलं तुम्हाला? (हसून) मृत्यू हा अटळ आहे, रमा ! प्रत्येक वस्तू आकारास येत असते ती नष्ट होण्यासाठी. मग ती आज होवो अथवा कैक वर्षांनी होवो. जे हृदयावर मरण झेलून तोलतात तेच अमर ठरतात. त्यांचं जीवन समृद्ध होतं, विशाल होतं. जीवन व मृत्यूचं भय बाळगणाऱ्याचं जीवन कधीही विशाल होत नाही.

**रमा** — आपलं असं काय वय झालं आहे, आपण असं बोलायला ?

> **मृत्यु काळ वाटतो खरा, पण त्याच्यासारखं दुसरं काव्य नाही. तो आईसारखा वाटतो; त्याच्या वात्सल्यात सामर्थ्य आहे, त्याच्यासारखी दुसरी पर्वणी नाही . . . .**

**माधव** — जीवन किती वर्षे जगता याला फारसा अर्थ नाही, रमा ! जीवन कसं जगता याला महत्त्व आहे. असं नसतं तर इंद्रधनुष्याचं नांव कुणी घेतलं नसतं, साऱ्यानी आकाशाचीच स्तुती केली असती. इंद्रधनुष्य होऊन क्षणभर जीवन जगता जगता जीवनाचे सप्तरंग उधळण्यात जे काव्य आहे तेच आम्ही जगतो आहोत आणि जगलो. रमा, आम्ही फार समाधानी आहोत, सुखी आहोत, तृप्त आहोत. दारी आलेल्या मृत्यूचं स्वागत करायला आम्ही मुस्तेज आहोत. आम्हाला मृत्यूचं भय वाटत नाही. (ठसका) कुणीतरी मनाचं दार ठोठावत आहे—रमा !

**रमा** — (थरकून) स्वामी !

**माधव** — केवढ्या थकलात आपण ! रमा, दमादमानं पुढं येणाऱ्या मृत्यूचं आम्हाला खुल्या दिलानं स्वागत करू दे. रागवेल तो, रुसेल नि निघून जाईल. आणि आम्ही असेच तडफडत राहू अशा जळण्या–विझण्यात ! येऊ दे त्याला रमा, येऊ दे !

**रमा** — किती वेळा सांगितलं की असं बोलू नका म्हणून !

**माधव** — अंतरीच्या उमाळ्याना शब्दांची सीमारेषा घालता येत नाही, रमा !

**रमा** — पण असं अमंगळ . . . .

**माधव** — पण तुम्ही एवढी काळजी कां घेता ? कशासाठी ?

**रमा** — आमची वेदना नाही उमजायची तुम्हाला !

**माधव** — एक विचारू ?

**रमा** — अं—विचारा ना !

**माधव** — काही नाही. जाऊ द्या ते सारं . . .

**रमा** — सांगा ना !

**माधव** — आम्ही विचारणार होतो . . . अं . . . ते फूल पाहिलंत !

**रमा** — ते ?

**माधव** — अं हं ! पलीकडचं.

**रमा** — हूं !

**माधव** — कसं सुरेख आहे, नाही ?

**रमा** — हो. (माधवराव हसतात. तशा बावरून) चुकलो का आम्ही ?

**माधव** — चुकी तुमची नाही. चुकला नियंताच. फुलाचं








सौंदर्य निरखण्यासाठीच तुमचे डोळे घडवलेत त्यानं. त्यांच्यामघला दडलेला अर्थ शोधण्यासाठी नाही

**रमा** — (लाजून) काहीतरीच...

**माधव** — (गंभीर होत) ते फूल कसं वेलीवर हासतंय... वाऱ्यावर कसं डोलतंय... आणि भारावून आपला सारा सौरभ उधळून देतंय... किती बहारीचं जीवन असेल नाही त्याचं!

**रमा** — हूं!

**माधव** — पण क्षणिक जीवनातच असली माधुरी असते हं! वेलीवर डोलणारं फूल तोडल्यावर किती काळ ते तसंच राहातं?

**रमा** — असं काय विचारणं ते!

**माधव** — रमा, संकटाना डोळेझाक करून चालत नाही. सूर्योदयाला सारं आकाश दिव्य तेजानं झळाळत असतं. पण सूर्यास्ताला तेच आकाश सहस्र रंग छटानी बहरून उठतं. आकाशाला एवढं उधाण कां येतं ठाऊक आहे?

**रमा** — आम्ही नाही उमजलो.

**माधव** — (मंद हसून) नाही? थोडा विचार केला असता तर उत्तर देणं कठीण नव्हतं, रमा!

**रमा** — चुकलो आम्ही.

माधव — अं हं! चुकलो आम्हीच. असा कोडचात सवाल विचारायला नको होता आम्ही.

**रमा** — असं काय म्हणायचं ते!

**माधव** — उभ्या आयुष्यांत असेच सवाल आम्ही प्रत्येकाला टाकले. पण प्रत्येकाच्या मनाला ते जखमा करीत गेले. वयाची भीडभाड न ठेवता प्रत्येकाला सवालानी धारेवर धरलं, पण आमच्या भोवती चौकटी पडल्या रोषांच्या आणि द्वेषांच्या! म्हणून म्हणतो आम्ही—स्वामी झालो तरी ते नियंत्याचे कैदी आहोत. आम्ही कुणालाच उमजलो नाही. (ठसका व कळा.) श्रीगजानन...गजानन!

**रमा** — बोलू नका ना! फार भीति वाटते आम्हाला.

**माधव** — आमची?

**रमा** — नाही. तुमच्या डोळ्यात होणाऱ्या विचित्र हालचालींची भीति वाटते आम्हाला.

**माधव** — (हंसून) मृत्यूची एवढी भीति वाटते?

**रमा** — तुम्ही सारं हसण्यावारी नेता!

**माधव** — कशा शहारलात आपण! चंद्राचा कोवळा किरण वाऱ्यावर उगाच थरकत रहावा ना? तशी थरथरली तुमची काया! (हसतात.)

**रमा** — (लाजून) काहीतरीच...

**माधव** — मृत्यू काळ असला तरी जीवनाचं खरं काव्य आहे ते. म्हणून म्हणतो रमा, वीरांचं आयुष्य अनुपमेय आहे. म्हणून ते चिरंजीव आहे.

(गहिवरतात. डोळे आसवानी भरून येतात.)

**रमा** — (दचकून) अं—हे काय स्वामी, डोळ्यात पाणी?

**माधव** — ते आनंदाश्रू आहेत, रमा! तुम्हाला नाही कळायचा त्यातला अर्थ.

**रमा** — सारं ठाऊक आहे आम्हाला. भावोजींची आठव आली असेल...

**माधव** — खरं आहे रमा! विश्वास सारखा डोळ्यासमोर येतोय् आमच्या. आणि ते पानिपतचं रणांगण... यमुनापार असलेली ती अब्दालीची फौज...डाव्या बगलेनं पुढं पुढं सरकू पाहाणारी ती गिलच्यांची फौज... ते रोहिले... ते जाट... आणि... आणिक... पलिकडे उंच उंच गवतात होळकरांची फौज दवा धरून बसली आहे... ते शिंदे ... पटवर्धन ... ते भाऊसाहेब ... कशा तळपताहेत त्यांच्या समशेरी... त्यातल्या त्यात विजेसारखं खड्ग तळपतंय विश्वासरावांचं... (भानावर येत) अं... विश्वासराव—? (मुस्कारत) गेलं ते काव्य! मृत्यूचा सोनेरी प्रवाह त्याच्यावरून खळाळत गेला. विश्वास धन्य झाला... वीराचं मरण लाभलं त्याला... आणि आम्ही? उकळत्या पाण्यावरचे केवळ बुडबुडे ठरलो... पेटलेले... पण स्वतःशीच फुटत राहिलेले...

**रमा** — किती वेळ बोलत राहाणाराहात असं! अंग किती गरम झालंय आपलं... अं... वैद्यराजाना आम्ही बोलवणं पाठवतो... (उठते.)

**माधव** — थाबा. आमची शपथ आहे तुम्हाला. जागरणानं ते किती त्रासून गेले आहेत. फार फार हाल सोसलेत त्यानी आमच्यासाठी. स्वार्थालाही काही बंधनं असतात, रमा!

**रमा** — पण औषधानं बरं वाटेल जीवाला!

**माधव** — आता हा केवळ कल्पनेतला खेळ उरलाय् रमा!

अनुक्रमणिका






**रमा** — असं अमंगळ बोलायला मन धजावतं तरी कसं तुमचं ?

**माधव** — ( मंद हसून ) निसर्गानं काहीच का शिकवलं नाही तुम्हाला ? फुलाचं फुलणं . . .कोमेजणं . . . दरियाची भरती–ओहोटी . . . चंद्रसूर्याचे उदय . . .अस्त . . .निसर्गाचा हा व्यवहार अव्याहतपणे चाललाय् . . . हे सारं आता आहे तर आता नाही. जन्म या दोन अक्षरात मरणाचा अर्थ अभिप्रेत असतो. हे फार थोड्यांना उमजतं. जे आहे ते नश्वर. त्यासाठी खंत ती काय म्हणून ! रमा, परमेश्वरावर श्रद्धा ठेव. कदाचित् ह्यांतूनही तो पार करील आम्हाला.

**रमा** — परमेश्वर ? कुठं आहे तो—

**माधव** — असं बोलू नका. श्रद्धेच्या ठायी परमेश्वराचा साक्षात्कार होतो, रमा !

**रमा** — परमेश्वर आहे तर आमच्या हाकेला अजून ओ कां देत नाही ? काय करायचं शिल्लक ठेवलंय आम्ही की, तो आमच्या हाकेला धावून येऊ नये. एवढा दानधर्म चालू आहे. शांती अनुष्ठानास ब्राम्हण घातलेत. गजाननावर अभिषेक होतो आहे. पण आपल्या प्रकृतीत तिळमात्र फरक नाही. एवढ्या का आम्ही पापी आहोत . . . अभागी आहोत ( माधवराव मंद हसतात. ) हासताय काय ?

**माधव** — केवढा द्वेष करताहात त्या परमेश्वराचा. परमेश्वर एवढा निष्ठूर नाही. सूर्यास्तापर्यन्त फुलं टवटवीत असतात. त्याचा अस्त झाला की ती कोमेजतात. त्यांना सतेज ठेवण्यासाठी चंद्र त्यांच्यावर चांदण्याचं माधुर्य बसवतो. पण ती अखेर कुस्करूनच जातात ना ? त्यांच्या आयुष्याचा प्रवास तेवढाच असतो, रमा ! (हसतात. )

**रमा** — ( चिडून ) सगळ्याच गोष्टी हसण्यावारी घालवण्याचा स्वभाव आहे तुमचा !

**माधव** — रागवलात ?

**रमा** — राग आणि आपल्यावर ? ते सामर्थ्य कुणाचं आहे.

**माधव** — फक्त तुमचं ! रमा, आमच्यासाठी किती श्रम घ्याल तुम्ही ! जाग्रणानं काया कशी कोमेजून गेली आहे. रमा, या अखेरच्या वेळी कुठल्याही विचारानं मन अस्वस्थ होत नाही. पण तुमचा विचार आला की, जीव नुसता गलबलून उठतो ( उबळ येते. )

**रमा** — जाऊ द्या ते. किती बोलायचं तरी !

**माधव** — आम्हाला थांबवू नका, रमा ! विझताना दिवा एकदाच मोठा होतो. अशा वेळी होणाऱ्या वेदनांचा तो मुलाहिजा करीत नाही. रमा, तुमच्याशी बोलायला उसंत मिळत नाही. जेव्हा आम्ही मोकळे असतो तेव्हा विचारांचं एवढं काहूर मनात उठलेलं असतं की, तोंडून शब्द फुटत नाही. आम्ही अक्षम्य अपराधी आहोत तुमचे.

**रमा** — हे भलतंच. काय बोलणं !

**माधव** — वयाच्या सोळाव्या वर्षीच गुलाबी तारुण्याचं काचपात्र फोडून आम्ही राज्याची जबाबदारी झेलली. फुलानं वज्र झेलून सावरलं. पण ती जबाबदारी पेलता पेलता जीव गुदमरून गेला. वाऱ्याच्या सुरावटीवर ताल घेत नाचू पाहाणारं मन आवरलं . . . विजेच्या अश्वावर आरुढ झालेल्या रुपेरी कल्पना जाळल्या . . . एका दिवसात आम्ही मोठे झालो . . . चारी दिशातून तलवारी पुढं सरसावल्या . . . घाव झेलताना आणि फटकारे मारताना अकरा वर्षे झटकन् निघून गेली . . . या अकरा वर्षाच्या कारकीर्दीत कर्नाटकात, नागपूरकर भोसल्यांशी, निजामाशी व हैदरशी लढाया करण्यात उमदी उमर निघून गेली. राज्य स्थिर झालं. उसंत मिळेलं असं वाटलं पण घरातल्या कलहानं आणि या व्याधीनं सोबत दिली. तुमच्याकडे लक्ष द्यायला आम्हाला फुरसत झाली नाही. ही वेदना ज्वालेसारखी आमच्या मनात फडफडते आहे, रमा !

**रमा** — आम्हाला काय कमी आहे ते असं बोलायला !

**माधव** — नाही रमा, तुम्हाला नाही जाणता यायचं आमच्या मनचं दुःख. कधी काही मागितलत नाही. कधी हट्ट केला नाही. ना आम्ही काही दिलं. तुमच्यावर फार अन्याय केला आम्ही, फार अन्याय केला.

**रमा** — तुमच्या चरणांखेरीज आम्हाला कशाचीच अपेक्षा नाही आणि नव्हती.

**माधव** — फार मोठ्या दिलाच्या आहात तुम्ही. रमा, आठवतं ?

**रमा** — काय ते ?




या महिन्यात साजरा झालेला आणखी एक 'उत्सव'







अनुक्रमणिका

**माधव** — खोटं नाही सांगत. आमच्या कारकीर्दीच्या आरंभीच आम्ही तुमच्या वडिलांच्या हाती असलेलं मिरज काढून घेऊन ते पटवर्धनाना दिलं. तुम्ही आम्हाला एका शब्दानं देखील विचारलंत नाही. तुम्ही सारं मनात ठेवून दिलं. तुमचा जय झाला. आम्ही हरलो. पुरते फसलो. रमा, कां पुसलंत नाही आम्हाला ? का हुंदका आवरून धरलात . . . कशासाठी ?

**रमा** — आमच्या लक्षातही नव्हतं हे !

**माधव** — याच तुमच्या मोठेपणानं आम्ही दिपून जातो, रमा ! या अकरा वर्षाच्या कारकीर्दीत फार काळ संगत दिली नाही. कसे दिवस काढले असाल आपण त्या एकटेपणाच्या भयानं ! केवढ्या यातना सहन कराव्या लागल्या असतील. रमा, तुम्हाला खरं सांगू, या क्षणाला आमच्या मनाचा थरकाप होतो आहे.

**रमा** — ( थरकून ) स्वामी !

**माधव** — राज्यकारभाराच्या धकाधकीत स्वतःकडे पहाण्याची कधी पर्वणी लाभली नाही. तुम्हालाही आम्ही दीपशिखेसारखं धगधगत ठेवलं. पण रमा, आता या मृत्यूच्या सावलीत एकटेपणा नकोसा वाटतोय. मनाला वाटू लागलंय . . . कुणाची तरी सोबत हवी आहे . . . या तडफडणाऱ्या मुक्या वेदनेवर मायेनं फुंकर घालणारं कुणीतरी हवं आहे. झाला तेवढा एकाकीपणाचा प्रवास खूप झाला. रमा, आम्हाला तुम्ही सोडून जाऊ नका. तुम्ही जवळ असल्या म्हणजे उरात उठणाऱ्या कळा सहन करायला ताकद येते. दुःख विसरता येतं. पण . . . पण नाही . . . या मृत्यूच्या सावलीत विसावताना तुमच्यावर आम्ही अन्याय करणार नाही. सक्ती करणार नाही. मनुष्य मरणाच्या सावलीत असला म्हणजे जगातली सारी बंधनं, मोहपाश आपोआप गळून पडतात. आणि तो स्वतंत्र होतो. तुम्ही स्वतंत्र आहात . . . आम्ही स्वतंत्र आहोत . . . .

**रमा** — नाही, नाही, आम्ही तुम्हाला कधीच अंतर देणार नाही. देवाब्राम्हणाला, धर्माला, अग्नीला साक्ष ठेवून तुमच्यासंगे सप्तपदी चाललो ते नातं असं अर्ध्यावर तोडण्यासाठी नाही. आम्ही कुणीच का नाही तुमच्या ?



**माधव** — कोणत्या शब्दानी आम्ही तुमची अपेक्षा करावी! पेशवे म्हणून राज्याची जबाबदारी पेलता पेलता पतीत या नात्यानं कितपत लक्ष दिलं आम्ही तुमच्याकडे ! पण रमा, आम्ही हे मुद्दाम केलं नाही. तशी उसंतच मिळाली नाही. व्याधीनं गाठलं तेव्हा सारी उमेदच खचून गेली. राज्याची स्वप्नं थोडीबहुत साकार झाली. पण संसाराची स्वप्नं मात्र तशीच राहिली. आता काहीच मोल राहिलं नाही त्याना. सौंदर्य असून गंध नसलेल्या फुलाप्रमाणे जीवन जगलो आपण !

**रमा** — नका हो असं बोलूं. आम्ही का परकी आहोत.

**माधव** — तसं नाही म्हणत आम्ही. राज्यकर्ता झाला तरी शेवटी तो मनुष्यच ना ? मनुष्याला जे धर्म लागू आहेत ते त्यालाही. या मृत्यूच्या दारात आम्हाला उधळलेल्या संसाराचं भेसूर चित्र दिसूं लागलंय. पहावं तिथे रंग उडालेल्या दिशा. रंग उडालेल्या सृष्टीत संसाराची काळपटलेली स्वप्नं हृदयाशी धरीत कुणी तरुणी आमच्याकडे रोखून पहातेय. कदाचित . . . आपणही असाव्यात त्या . . . ( ठसका.)

**रमा** — नाही, नाही. तुमच्या चरणाखेरीज आमची कशावरदेखील अभिलाषा नाही.

**माधव** — आमची पुनर्जन्मावर श्रद्धा आहे. विश्वास आहे. तुमची साथ लाभली तर अजाणतेपणानं झालेला अन्याय आम्ही भरून काढू. रमा, आपलं जीवन कधीच संपणारं नाही. जीवन कधीच संपत नसतं. ते पुन्हा नव्यानं सुरू होणारं असतं. ज्याला आपण अंतकाळाच्या वेदना समजतो त्या पुनर्जन्माच्या वेणा असतात. उद्याच्या उषःकालाचं माधुर्य चाखण्यासाठी आधी अंधारातच चाचपडावं लागतं. अंधार हा कधीच अंधार नसतो. उषःकालाच्या स्वागतासाठी परमेश्वरानं अंधाराचा सनई–चौघडा सदैव जागता ठेवला आहे हे फार थोडयाना समजतं, रमा !

**रमा** — ( अचानक ) अग बाई ! आमचं लक्ष नव्हतं. किती घाम आला आहे तुमच्या अंगाला !

( पुसण्यासाठी शालू हातात घेते. माधवराव त्यांचा हात अडवितात.)

**माधव** — जाऊ द्या. फक्त आमच्या समीप बसावं. घडीभर प्रकाश आहे. पुढं आहे तो अं . . . . . .

**रमा** — असं बोलू नये. असं अमंगळ . . . .

**माधव** — रमा, ते चित्र पाहिलंत ? हिंदवी स्वराज्य उभारणाऱ्या थोरल्या छत्रपतींच ते तेजस्वी शिल्प . . . त्यांच्या चरणी श्रीमंत थोरले बाजीराव पेशवे यानी उत्तरेला सनदा मारल्या. फिरंग्यांच्या धणाणत्या घंटेतून मराठी सत्तेच्या विजयाचं गाणं घुमविलं ते चिमाजी अप्पानी . . . हे भाऊसाहेब . . . हा विश्वास . . . ज्या वीरानी उत्तरेकडे तलवारी चालवल्या . . . अटकेपार भगवे झेंडे फडकवले . . . त्या मराठी वीराना पानिपतात अपमानित पराभव सहन करावा लागला. रोहिले आणि पठाणांच्या तलवारीच्या धारेखाली अवघ्या मराठ्यांची कत्तल





झाली. उत्तरेच्या इतिहासात हा मराठ्यांचा पराजय कधी धुवून निघेल असं वाटलं नव्हतं. शिंदे पानशांच्या साहाय्यानं दिल्लीपती तख्तावर पुन्हा स्थानापन्न झाले याचं सुख आम्हाला तेवढंसं सुखद वाटलं नाही. त्यासाठी जीव तळमळत होता . . .पण त्या दिवशी तो उत्तरेकडून आलेला खलिता वाचून आयुष्याचं सार्थक झालंसं वाटलं. आपल्या मुठभर मराठ्यानी पठाणांचा केलेल्या पराभवाचा तपशील वाचून अमृताचा वर्षाव होतो आहे असं वाटलं. यापरता आनंद तो काय वर्णावा ! पराभवाचा डाग धुवून निघाला . . . केवढे भाग्यवान आम्ही ! एवढं भाग्य कुणाच्या वाट्याला येतं ! धन्य त्या वीरांची ज्यानी देशासाठी बलिदानं केली. केवढ्या विजयानंदात होतो आम्ही . . . विजयाची बेहोषी चढली होती . . . पण मनात एक अनामिक वीज लखलखली तेव्हा ? सारा आनंद . . . सारी बेहोषी क्षणार्धात मातीमोल झाली. रमा, तो विजय आमचा नाही. उभ्या आयुष्यात आम्ही कधीच विजयी झालो नाही. लहानपण न समजण्यात गेले. समजू लागलं तशी जाणवली वडिलांच्या व मातोश्रींच्या शिस्तीची जरब . . . आयुष्यात आई-वडिलांच्या प्रेमापेक्षा त्यांचा दराराच अधिक जाणवला. तारुण्यात पदार्पण केलं आणि अचानक ही राज्याची जबाबदारी अंगावर येऊन पडली. आणि तो पेलता-पेलता साऱ्या वैयक्तिक जीवनाकडे दुर्लक्ष झालं. स्वतःचं असं काहीच घडलं नाही नि राहिलं देखील नाही. ज्यांच्यावर निष्ठा ठेवून राहिलो त्या मातोश्रींचं अंतःकाळी दर्शनही आम्हाला दुर्लभ झालं. ज्यांच्या पराक्रमानं लहानपणापासून दबून होतो, जे आदर्श वाटले तेच काका शत्रूला मिळून राज्याविरुद्ध उभे टाकले ( ठसका ). त्याच काकाना आज या हातानं नजरकैदेत टाकलं. जेवढी ताकद काकाना सावरण्यात खर्ची पडली तेवढी जर वाचली असती तर राज्याचे कोणतेच स्वप्न साकार व्हायचं राहिलं नसतं. कडक शिस्तीच्या आई-वडिलांच्या प्रेमाला मुकलो. काकांच्या प्रेमापोटी राज्याशी बेईमान झालो. तुमच्या सारखं सात्त्विक प्रेम जवळ असूनही त्यापर्यन्त पोहोचू शकलो नाही. सारं आयुष्य जळालं गृहकलहात . . . आणि या व्याधीत. या अकरा वर्षांच्या कारकीर्दीचं सिंहावलोकन केलं तर आम्ही अपयशीच ठरलो . . . अपयशीच राहिलो . . .

**रमा**— असं काय म्हणायचं ते !

**माधव**— खरं आहे, रमा ! प्रत्येक मनुष्य हातून घडलेल्या इतिहासावरच स्वतःच्या जीवनाचे यश अजमावतो. ही बाब लक्षात घेता तुमचा पती सदैवच अपेशी ठरला आहे. एकटा आला. . एकाकी जगला . . एकटा राहिला.

**रमा**— तुमच्या जीवनात आम्हाला काहीच का स्थान नाही ?

**माधव**— असा विपर्यास करून घेऊ नका. तुम्ही नसता तर कुणी सांगावं . . . हे सारं सहन करण्याचं त्राणही राहिलं नसतं अंगात. आता आशा राहिली ती फक्त एकच, तुमच्या सोबतीची . . . तेवढी मिळवली तरी पुष्कळ आहे.

( हुजऱ्या येतो.)

**हुजऱ्या**— (मुजरा करीत) नाना आलेत !

**माधव**— पाठव त्याना आत.

**रमा**— आम्ही जातो. ( जाऊ लागतात. )

**माधव**— नाना काही परके नाहीत.

[ खुणेनेच 'नाही' म्हणत निघून जाते. नाना फडणवीस येतात. मुजरा करून आदबीनं उभे राहतात. ]

**नाना**— श्रीमंत !

**माधव**— नाना, आज लौकर आलात ?

**नाना**— होय श्रीमंत !

**माधव**— उत्तरेच्या विजयाचा खलिता तातडीनं पाठविलात ना ?

**नाना**— श्रीमंतांची आज्ञा आम्ही लागलीच अमलात आणली.

**माधव**— ठीक केलंत, नाना ! उत्तरेच्या विजयानं आमच्या आयुष्याचं काहीसं चीज झालं. टिपूचाही पराभव झाला.

**नाना**— हैदरही पार जेरीस आला. दाती तृण धरून शरण आला. एवढ्यात डोकं वर काढील असं वाटत नाही, श्रीमंत !

**माधव**— ( सुस्कारत ) नाही नाना, हैदरवर आमचा बिलकूल विश्वास नाही. म्हैसूरच्या स्वारीत आम्ही दोन वेळा जातीनं हजर होतो ते त्याचा समूळ बीमोड करण्याच्या इराद्यानंच . पण आम्ही उणे पडलो. आमच्या व्याधीनं उचल घेतली आणि मोहीमा आम्हाला अर्ध्यावरच सोडून पुण्याला परतावं लागलं. पण नाना, हैदरचा पुरा बीमोड झाल्याखेरीज आमच्या आत्म्याला मुक्ती लाभणार नाही.

**नाना**— श्रीमंतांचा आमच्यावर विश्वास असला म्हणजे—

**माधव**— विश्वास आमचा साऱ्यांवरच होता आणि आहे. पण आमच्या डोळ्यांची भाषा कुणाला जाणता आली नाही आणि कुणी तसा प्रयत्नही केला नाही. हीच त्यामागची शोकान्तिका आहे, नाना ! त्यामुळे आम्ही एकटे आणि एकाकी पडलो आणि राहिलो. विचार होते आकाशाचे चुंबन घेण्याचे. पण अंतरीचे पंख होते थकलेले. अंतराळात झेप घेणाऱ्या आमच्या उमेदीच्या ऐनभरात ही शोकान्तिका झाली एका कोवळ्या शासनकर्त्याची ! ( थबकून) जाऊ द्या, नाना ! या अखेरच्या प्रसंगी तरी आम्हाला खोलात शिरावंसं








अनुक्रमणिका

वाटत नाही आणि तशी इच्छा नाही. उत्तरेच्या विजयाच्या वार्ता पुण्यात सर्वांच्या कानी पडल्या ना ?

**नाना**— होय श्रीमंत ! तशी दौंडी पिटण्यात आली. नागरिकांनी घरोघरी दीपोत्सव साजरा केला.

**माधव**— आणि छत्रपतींना ?

**नाना**— आपल्या आज्ञेनुसार त्या दिवशीच साताऱ्याला खलिता रवाना केला.

**माधव**— बरं केलंत ! आता फार मोठी जबाबदारी आहे. मुलुख जिंकणं सोपं आहे, पण तो राखणं . . .

**नाना**— श्रीमंतांची आज्ञा असेल तर —

**माधव**— आज्ञेची काही जरुरी नाही नाना, बोला. मन मोकळं करा. या अखेरच्या दिवशी तरी साऱ्यांच्या खुल्या दिलाची बरसात होऊ द्या आमच्यावर. बोला. मनात किंतु न ठेवता सारं सांगा, नाना !

**नाना**— क्षमा असावी श्रीमंत ! बाहेर दादासाहेब देखील आलेत.

**माधव**— इथं आलेत ! मग काका बाहेर कशासाठी ? या मृत्यूच्या सावलीत तरी ते आम्हाला भेटू द्या. आमच्याशी खुल्या दिलानं बोलू द्या. काही मागणं असेल . . . तेही मागून घ्यावं त्यांनी . . . आता तरी आमच्याशी प्रेमानं बोलू द्या . . . बोलवा त्यांना . . . आम्हाला ताकद असती तर आम्हीच गेलो असतो त्यांच्या स्वागताला. मोठ्या प्रेमानं स्वागत केलं असतं. अखेर काका आम्हाला मिळाले म्हणून आमच्या प्राणांची आरती ओवाळू द्या त्यांच्यावरून ! गजानन ! धन्य तुझी किमया !

( राघोबा येतात. चेहरा अपराध्यागत )

**माधव**— नाना, हात द्या. गजानन . . .

( नाना तसे करतात. माधवराव लोडाला टेकून बसतात. कळा सहन करीत. ) गजानन . . .

**नाना**— श्रीमंत ! आज आम्ही लाचार आहोत. दुःख होतं आहे. पण आम्हाला आमचं कर्तव्य बजावलंच पाहिजे. पण . . . .



**माधव**— स्पष्ट बोला नाना, स्पष्ट बोला. आमच्या तबियतीचा मुलाहिजा आता खूप झाला.

**नाना**— तसं नाही श्रीमंत ! प्रसंग नाजुक तर आहेच शिवाय आमच्या हातून कसूर झाली असा ठपका आम्हावर यायला नको यास्तव सांगणं होतं आहे. उत्तरेच्या विजयाची वार्ता ऐकून आम्ही काहीसे गाफिल होतो. डोळ्यात फुललेल्या विजयोन्मादाच्या इंद्रधनुष्यामुळं आम्ही आमचं कर्तव्य विसरलो . . . या संधीचा फायदा घेऊन दादासाहेबांनी निसटून जाण्याचा प्रयत्न केला. कट उघडकीस आला. पळून जाणाऱ्या दादासाहेबांना आम्ही गिरफदार केलं. आपल्याला न कळविता हे प्रकरण आम्हाला पेलता येणारं नव्हतं. यास्तव नाईलाजेनं त्यांना आपल्यापुढं उभं करावं लागत आहे. याबद्दल कसूर माफ असावी.

**माधव**— (राग आवरून) काका !

**दादा**— अपराध क्षम्य असावा, माधवा !

**माधव**— ( रागाने थरथरत ) नाना, सत्वर साताऱ्याला खलिता पाठवा —

**नाना**— ( दचकून ) श्रीमंत !

**दादा**— ( थरारून) माधवा !

**माधव**— आम्ही नारायणरावांच्या नावे पेशवाईची वस्त्रे मागविली होती ती काकांच्या नावे आणावी. काकांना पेशवेपद प्राप्त झालेलं पहाण्याचं भाग्य आम्हाला लाभू दे.

**दादा**— माधवा, नको रे असं बोलूस. तशी आमची इच्छा नव्हती आणि नाही.

**माधव**— बस् . . . बस् ! आयुष्यभर हेच बोल ऐकत आलो आम्ही. भांडण, तंटा, मनःस्ताप सहन करण्याची ताकद आता आमच्या अंगात राहिली नाही. ( ठसका. पण दुर्लक्ष करीत ) आम्ही फारा दिवसांचे नाहीत. आज आहोत, उद्या नाही. आपल्याला समजावून पाहिलं . . गोंजारून पाहिलं . . . लाखदा मान झुकवली . . . आपल्या वर्तनानं आयुष्यभर जळत राहिलो. एवढंच नव्हे, पेशवेपदाचा शिरपेंच दोनवेळा तुमच्या चरणी ठेवला आम्ही. डोळ्यात दाटून येणारं पाणी पापणीआड लपवलं आणि दुःख गदगदत ठेवलं अंतरात ! काका, आम्हाला ठाऊक नाही असं वाटतं तुम्हाला ? गारद्यांचा मारा अमच्यावर घातलात ? ( ठसका व कळा )

**दादा**— ( चमकून) माधवा !

**माधव**— पण मारणांऱ्यापेक्षा तारणाराच श्रेष्ठ असतो, काका ! गजाननाची आमच्यावर खैर होती म्हणून आम्ही बचावलो. झालेल्या घटनेची शहानिशा करून तुम्हाला गिरफदार करण्याची, नव्हे शिक्षा ठोठावण्याची शक्ती आमच्या ठायी नव्हती काका, एक शासनकर्ते म्हणून ? पण दुःख आम्ही मनात ठेवलं. काका सुधारतील या आशेनं. अखेर नजरकैद केलं. पण आपल्यात सुधारणा झाली नाही आणि होण्याची शाश्वती नाही.

**दादा**— नको माधवा, असा अविश्वास नको रे दाखवूस आमच्यावर










आमच्यावर विश्वास ठेव. राज्य मिळविण्याचा इरादा नव्हता आमचा !

**माधव**— ( उसळून ) खबरदार ! शब्द फिरवता येतात पण डोळ्यात उतरलेला त्यांचा अर्थ पुसता येत नाही, काका !

**दादा**— माधवा . . . माधवा . . .

**माधव**— राज्य नको होते तर निजामाशी सधान बांधून पुणं लुटण्याचं आपलं प्रयोजन—हीच तुमची राज्यनिष्ठा ? इंग्रजाशी हात मिळवून परका घरात घुसविण्याचं आपलं धोरण—हीच तुमची राज्यनिष्ठा ? आपले हे वर्तन निःस्वार्थी कोण म्हणेल ? नाही काका, हा सारा मनःस्ताप सहन करण्याची ताकद उरली नाही आता आमच्या अंगात. मन जळते ठेवून सारे अपराध तुम्हाला क्षम्य केले. पण तुम्हाला ही पर्वणी वाटली. आमचं आणि पर्यायानं मराठी दौलतीचं भस्म करायला निघालात. साऱ्या आयुष्यभर काकांचे लाडपुरवण्याखेरीज आम्हाला दुसरं कामच नाही ? तुमच्या जागी दुसरा कुणी असता तर —

**दादा**— ( चमकून ) तर काय केलं असतं, माधवा !

**माधव**— ( उसळून ) काय केलं असतं ? आम्हाला विचारता, काका ? ही हिम्मत ? कुठून आणलंत हे बळ ? एवढी हिम्मत कुठून आली तुमच्या अंगात ?

**दादा**— माधवा —

**माधव**— ( कडाडून ) साखळदंडांनी बांधून हत्तीच्या पायी तुडवलं असतं. मेख मारून उभा देह चिरला असता. तोफेच्या तोंडी उभं केलं असतं आणि चिंध्या झालेला देह अस्मानभर पसरविला असता त्यानं राज्याविरुद्ध बंड केलं असतं तर ! तुमच्या ठायी आमचा मुलगा असता तर त्यालाही अशीच देहान्ताची शिक्षा ठोठावली असती . . . एक शासनकर्ता या नात्यानं !

( ठसका. जीव कासावीस होतो. नाना पंचपात्र घेऊन पुढं करतात. पाणी घेतल्यावर भानावर येतात. )

**दादा**— माधवा, तुझी तबियत ठीक नाही. विश्रांती घे. आपण उद्या बोलू. ( जाऊ लागतात. रमा येते. )

**रमा**— थांबा मामंजी ! शपथ आहे असं अर्धवट बोलून गेलात तर ! आता फार सहन करण्याची ताकद राहिली नाही इकडची !

**दादा**—(कळवळून) मुली, काय म्हणतेस हे ! एवढे का आम्ही पापी आहोत !

**माधव**—काका, असे हळहळू नका. डोळ्यात आसवं गोळा करू नका. आपण तीन वेळा मराठी राज्याविरुद्ध बंड केलंत. इंग्रजाना फितूर झालात आणि शत्रू घरात आणलात. निजामाशी समेट करून पुणे लुटलंत. हिरा कोणता आणि काच कोणती, अमृत आणि विष कोणतं, यातला फरक आपल्याला ओळखता आला नाही. मराठी माणूस तुम्ही—मराठी माणसांवर तलवार चालवलीत. काही सुचत नाही आम्हाला काका, काही सुचत नाही. तुमच्यामुळं राज्यात दुही माजली. दोन तट पडले. आमच्याशी बोलताना जिभेवर मध ठेवून बोलणारी माणसं आम्हाला ओळखता का येत नाहीत ? पण आम्ही शहानिशा केली असती तर ती सारी सुटली असती आणि दरबाराच्या न्यायाप्रमाणे तुम्ही तोफेच्या तोंडी गेला असता. पण आम्ही मोह आवरला. आम्हाला काका हवे होते. त्यांच्या पराक्रमाचा, त्यांच्या अनुभवाचा आदर्श मनात ठेवून आम्ही राज्याची सूत्रं हालवत होतो. पण त्याच आदर्शानं आम्हाला दगा दिला. आपणाला सावरण्याची आम्ही शिकस्त केली. आपणाला कैद केलं. पण कैदेत ठेवलं नाही. वर्षाकाठी लक्षावधी रुपये तैनात देऊनही आपलं समाधान झालं नाही. तुम्हाला सुलतानी शौक करण्याची हौस. पण त्याबरोबरच त्यांच्या रक्ताचा गुणधर्म तुमच्या रक्तात भिनला असेल याची आम्हाला कल्पना नव्हती. शासनकर्ता आसन्नमरण असला म्हणजे त्याच्या मुलानी त्याच्या मरणाची वाट न पाहता नाती तलवारीच्या धारेखाली कापून तख्तावर येणं हा त्यांचा रिवाजच आहे. काका, तोच आपण पाळता आहात.

**दादा**—माधवा, नको रे असं बोलू ! काय सांगू तुला. आम्ही चूक करून चुकलो. तू म्हणतोस तसे आम्ही नाही. पदरचे इतर कान भरवतात.

**माधव**—ते आम्ही जाणून आहोत, काका ! आपलं मन योग्य संगतीत व सल्ल्यात रमत नाही हेही आम्ही जाणून आहोत. पण हा दोष त्यांचा नाही. फार तर त्याना स्वार्थी म्हणता येईल. पण अक्कल शाबूत ठेवायची ती आपण, काका ! तुम्ही ती गहाण टाकलीत, त्याचा दोष त्यांच्यावर का ? काका, असे मराठी राज्याविरुद्ध उचल घेऊ नका.

**दादा**—नाही माधवा, असं पुन्हा होणार नाही. विश्वास ठेव आमच्यावर !

**माधव**—मनाला नाण्यासारख्या दोन बाजू असतात, काका ! पण जाऊ द्या ते. काका, आम्ही फार वेळचे सोबती नाही. तुम्ही



वृत्तपत्रांचा 'गोविंदा' चालू आहे.



मोठे आहात. गाठीशी अनुभव आहे. नारायण लहान आहे. त्याच्या मानानं राज्य मोठं आहे. त्याला एकटयाला झेपणारं नाही ते. त्याला अनुभव नाही. तापट आहे. अशा परिस्थितीत दौलत सुरक्षित राहील असं वाटत नाही. त्याला आम्ही गुंतवत नाही. आपणच ती जबाबदारी....

**दादा**—छे, छे, माधवा, राज्याचा आम्हाला लोभ नाही. प्राण गेला तरी आम्ही होय म्हणणार नाही.

**माधव**—(गहिवरून) काका, काका !

**दादा**—आम्ही वचन देतो माधवा, आमच्या हातून पुन्हा असं होणार नाही. आणिक—

**माधव**—बोला काका, खुल्या दिलानं बोला.

**दादा**—खरं सांगतो माधवा, हवं तर आम्हाला देहदंड कर. पण आम्हाला पुण्याला पाठवू नकोस. आम्ही इथं राहातो आपल्याजवळ.

**माधव**—ठीक आहे. काका, आजपासून आपण मोकळे आहात. तुम्ही इथं राहिलात तर आम्हाला आनंद होईल. गजानना... (एकाएकी ग्लानी येते. नंतर सावध होत. गजानना, किती अंत पाहशील. सोडव या यातनातून. आई ऽऽग ! काका—

**नाना**—श्रीमंत, दुःख आवरावं.

**माधव**—काका कुठं आहेत ?

**दादा**—बोल माधवा, आम्ही जवळच आहोत.

**माधव**—काका—खंजीर—

**दादा**—(दचकून) माधवा !

**माधव**—नाही सहन होत या वेदना, (ठसका.) गजानन ! गजानन ! (थबकून) काका, खंजीर द्या.

**दादा**—पण माधवा—

**माधव**—तुम्ही वचन दिलंय आम्हाला. काका, खंजीर !

**दादा**—आम्ही वैद्याना —

**माधव**—(रागाने) खंजीर ! अं—अस्सं ! ही हिम्मत! नाना,...

**नाना**—आज्ञा श्रीमंत !

**माधव**—नाना, आसूड आणा आणि आमच्या आज्ञेनुसार—

**रमा**—हे काय वागणं, स्वामी !

**माधव**—रमा, नका अश्रू ढाळू. उठणाऱ्या वेदना नाही सहन होत आम्हाला. पुसा ते अश्रू. आमच्या अंगात ताकद असती तर आम्हीच पुसले असते तुमचे अश्रू. अश्रू पुसण्याचं सामर्थ्य देखील आमच्यात राहिलं नाही. हेच तुमच्या पतीचं अपयश आहे, रमा ! (ठसका.)

**रमा**—बोलू नका ना ...

**माधव**—(म्लान हसून) रमा, एवढ्या वेड्या का आहात तुम्ही ? मृत्यूच्या दारातलं सौंदर्य काही निराळंच असतं. ती वेहोषी आमच्या अंगाअंगात भिनली आहे आज ... तीच बोलते आहे ... ही मृत्यूची चाहूल आहे, रमा !

**नाना**—श्रीमंत —!

**दादा**—माधवा, असं नको रे बोलूस. तू आम्हाला हवा आहेस.

**माधव**—(हसून) काका, अपमानाची लक्तरं सावरीत आमचं मन तुमच्यापुढं लाखदा झुकलं. तेव्हा आम्हाला लाथाडलंत. (ठसका.) तेव्हा तुम्ही बेताल होता. बेवंद होता.

**दादा**—जाऊ दे माधवा, आता आम्ही तसे राहिलो नाही. आमच्या चुका आम्हाला कळून आल्या.

**माधव**—(खिन्नपणे) पण फार उशीरा. काका, तुम्ही आमच्या पाठीशी असता तर दक्खनच्या दौलतीचे तुकडे झाले नसते. दुही माजली नसती. शत्रू घरात घुसला नसता. अवघं मराठी राज्य झालं असतं. पण काका, ते भाग्य पहाणं आमच्या नशिबी नव्हतं. काका, या मरणाच्या सीमारेषांवर उभे असताना—आम्ही तुम्हाला विनंती करीत आहो.

**दादा**—(गदगदून) माधवा —

**माधव**—नारायणाला आम्ही तुमच्या ओटीत घालतो. आम्हाला वचन द्या—काका, नारायणाचा सांभाळ करू असं

**दादा**—नारायण आम्हाला कुणी परका का आहे, माधवा ! आम्हाला तो पुत्राप्रमाणेच आहे. त्याचा सांभाळ करू.

**माधव**—नाना, येतो आम्ही. नारायणावर कृपाछत्र असू द्या. कुठं चुकला, सावरा त्याला. बापू आहेत. रास्ते पटवर्धन आहेत. तुमच्या सल्लामसलतीनं कारभार चालू ठेवा.

**नाना**—(गहिवरून) श्रीमंत ! श्रीमंत !

**माधव**—रमा, कशाकरिता हे अश्रू ढाळताहात तुम्ही ! मृत्यु एवढा भयानक वाटतो तुम्हाला ? नाही रमा, मृत्यू भयानक नाही. मृत्यू काळ वाटतो खरा, पण त्याच्या परतं जगात दुसरं काव्य नाही. मृत्यूचा मद मदिरेपेक्षा मस्त असतो. त्याच्या सावलीत गेलेल्या प्रत्येक मनुष्याला तो आईसारखा वाटतो. या आईचं वात्सल्य आम्हाला लाभू दे. या वात्सल्यात फार मोठं सामर्थ्य आहे. मृत्यूच्या सृष्टीत सारे पाश गळून पडतात. दिक्कालाची बंधनं तुटून पडतात. मानापमानाच्या चौकटी इथं नसतात. यशापयशाची मोजणी इथं केली जात नाही. आजूबाजूला हेलावत असतं मुक्तत्त्वाचं वातावरण... सारं धुंद वातावरण ... सारं मखमाली...सारी बेहोषी...या सोनेरी दुनियेत जिवानं फिरायचं ते फुलपाखरासारखं... सत्याच्या फुलाफुलांवर वागडायचं... त्यात दडलेला शिवाचा मध चाखायचा ... आणि सुंदर व्हायचं ...यापरतं दुसरं भाग्य नाही. यासारखी संतोषी नाही... यासारखी दुसरी पर्वणी नाही... येऊ दे मृत्यू... या सोनेरी ओठानी चुंबन घेईन त्याचं ...इंद्रधनुष्याच्या या हातानी बाहुपाशात कुरवाळेन त्याला ... विरघळेन त्यात ... वाहात जाईन ...जिथं मुक्तीचा सुगंधी किनारा असेल, तिथल्या गंधित मातीवर हा देह मिसळून देईन ... अहा ! ... काय काव्य ! काव्य जगण्यासाठी मृत्यूला मिठी मारू दे मला ... रमा, रमा ... गजानन ...गजानन...

(साऱ्याना हुंदका अनावर होतो. पण रमाबाईचा चेहरा एका निराळ्याच तेजानं झळाळत असतो. तिच्या नजरेसमोर फडफडत असतात फक्त सतीची वस्त्रे ! )

●●●



—वसंत देशमुख




# साडी आणि फ्रॉकचे

**डेक्कन** क्वीनूनं प्रवास करणारे प्रवासी अशा रुबाबात गाडीत चढतात की कुणाला वाटावं काही गाडी त्यांच्या तीर्थरुपांचीच खासगी मालमत्ता असावी ! गाडी थंडपणे उभी होती–एखाद्या मख्ख नव्या सुनेसारखी ! प्रवासी त्याहीपेक्षा मख्ख मुद्रेनं फलाटावर चालत होते..... आपापला डबा शोधताना इतर लोक ह्या गाडीत आहेत हीच कल्पना जणू त्याना सहन होत नव्हती !

बंडू चितळेही आपला ओव्हरकोट सावरीत डबा शोधत होता. बंडू चितळेचा आता "बी. एन्. चितळे" झाला होता. म्हणूनच त्याच्या सदाशिव पेठी पोषाखात आमूलाग्र क्रान्ती झाली होती. टेरीलीन्चा पांढरा शुभ्र शर्ट, अंगाला चिकटणारा टाईट् सूट्, जपानचा झिरमिरीत टाय्, चकचकीत काळे बूट, गोरीपान मुद्रा, लखलखते, मांजरासारखे डोळे, पारकरचं पेन्, रेबॉन्चा मोठाला हिरवट काळसर चष्मा ! गेली ! ती शॉर्ट् पॅण्ट्, तो मळका शर्ट्, ती काळी टोपी !

"काय रे बंडू ? कुठं चाललास ?" असा सलगीचा प्रश्न सदा गोखलेनी केला. तो खरं म्हणजे त्याला मुळीच आवडला नाही ! हूँः ! डेक्कन्नी जाणारी माणसं काय कामशेतला नाही तर खडकीला जातात होय ? मूर्ख लेकाचा !

"बाॅम्बे ऽऽऽऽऽ ! पुणं सोडलं केव्हांच ! " एवढंच बोलून, सत्ताविसाव्या वेळी खांद्यावरचा ओव्हरकोट पालटीत तो आत शिरला.

"चितलेऽऽ ! चितलेऽऽ ! चितलेऽऽऽऽ ! यस् ! हीअर् यू आर् ! !" तो स्वतःशीच पुटपुटला नि आपल्या जागेवर त्यानी साहेबी बेदरकारपणे अंग झोकून दिलं !

पावसाळा होता म्हणून की काय डबा रिकामाच होता ! त्याला बरं वाटलं !

तोच एक उंच, धिप्पाड पाश्चिमात्य प्रस्थ आत शिरलं. बंडूनं आपली छोटी बॅग् उगाचच सावरली ! हिन्दु डरपोकपणा ! त्याचं त्यालाच वाटलं ! लगेच त्यानं बॅग्वरचा हात काढलादेखील !

गोरा, सडसडीत, सोनेरी चष्मा, तीक्ष्ण, ससाणी नजर, आखूड कापलेले केस, एक मोकळी मिजास आणि तरीही मुद्रेवर निरागसता ! त्याच्या हातातल्या छोटचा हॅण्ड्बॅग्कडं पाहून बंडूला आश्चर्यही वाटलं नि करमणूकही झाली.

अगदी जुळ्या बहिणीसारख्या दोघांच्या बॅग्ज् होत्या ! त्याच्याही ते लक्षात आलं. तो खुदकन् हसला.

" द सेम् ! " बॅग् दर्शवीत तो म्हणाला.








जोक्वर हसले. अर्थात् वंडूशिवाय सगळेच मनमुराद हसले. !

" सातशे पंच्चेच्याळीस ! खोला !"

" वट् . . . !"

"शट् अप् !" साहेबांचा आवाज एकदम चढला !

सातशे पंच्चेच्याळीसने वंडूच्या हातून बॅग् हिसकावून घेतली.

" दारूच्या वाटल्या आणतात साले !" इन्स्पेक्टर साहेवानी आपला सात्विक संताप व्यक्त केला !

" चावी द्या !"

निमुटपणे वंडूनं चावी दिली. बॅग् उघडली आणि बंडूचे डोळे गरगरायलाच् लागले.

एक अत्यंत झिरझिरित फ्रॉक्, लिंगरी आणि स्त्रीलज्जा रक्षणाचं इतर साहित्य त्या बॅग्मधून एक मादक हास्य उधळीत होतं.

सातशे पंच्चेच्याळीसनं कपड्याखाली चाचपून पाहिलं. इन्स्पेक्टर् साहेबांचंही कुतुहल जागृत झालं होतं. त्यानीही आपला राकेट, केसाळ हात त्या नाजुक कपड्याखाली घुसविला.

जाडजूड ट्रेसिंग् पेपर्ची चवड ! त्यानी ती बाहेर काढली. प्रत्येक कागदावर वेगवेगळा आराखडा काढला होता. नुसतेच आराखडे ! इतर तपशील काहीच नव्हता !"

"हे . . . हे प्लॅन्स् कसले आहेत ?"

"मला माहीत नाही ?"

" अच्छा ऽऽ! तुम्हाला माहित नाही! अच्छा ! अन् काय हो ? हा एवढा नखरेल फ्रॉक् कुणासाठी ?"

" मला माहीत नाही !"

" अच्छा तुम्हाला माहीत नाही ! ओके ! ओके ! होईल माहिती ! होईल बरं ! ओ आय् सी ! " इन्स्पेक्टर, साहेबांचे नेत्र लकाकले ! डाव्या हाताच्या पंजावर उजव्या हाताची मूठ त्यानी जोरात मारली.

" आपलं नाव काय ?"

" बंडू चितळे ऽ ऽ ऽ !"

" यू मीन् चितळे !"

"यस !"

"थँक्यू ! एका पाश्चिमात्य तरुणीच्या मदतीनं आपण हे महत्त्वाचे प्लॅन्स् गुप्तपणे पळवीत आहात . . . तिचे कपडेही ह्या बॅगेत आहेत. तिनं आपली कामगिरी वजावली आहे. तिनं हे जोखमीचं काम आता तुम्हाला दिलं. तुम्ही हे प्लॅन्स् शत्रूराष्ट्राना देण्याच्या तयारीत होता. तुम्ही . . .तुम्ही हेर आहात असा आमचा संशय आहे !

" अहो, साहेब ! पण ही बॅग् माझी नाही !"

"हेर काय किंवा चोर काय ? अस्संच म्हणतो ! पण तुम्ही ट्रेनिंग् मात्र उत्तम घेतलंयत हं ! ओके ! अच्छा ! आंतरराष्ट्रीय हेरांच्या टोळीचा शोध लागणार नक्कीच ! चितळे ऽऽऽ! राष्ट्रावर उलटणाऱ्या तुमच्यासारख्या विलंदराना गोळ्या घालूनच ठार मारलं पाहिजे !

सातशे पंच्चेच्याळीस ! आत न्या ह्याना ! तोवर मी "एच. क्यू." ला खबर देतो !" उल्हसित होऊन ते म्हणाले.

* * *

" हॅलो डार्लिग !"

'हॅलो !"

आल्टमौंट्रोडवरच्या प्रशस्त फ्लॅट्मध्ये शिरताच त्या अमेरीकन् तरुणाची पत्नी त्याच्यावर लोंबकळलीच ! वटवृक्षाच्या पारंब्यासारखी !

" प्रवास कसा झाला ?"

" फाईन् !"

" कुणी मस्त छोकरी भेटली की नाही प्रवासात?" खट्याळपणे हसत तिनं विचारलं. (पान ५२ वर पहा)

"ओ ऽऽ! द सेम्" अमेरीकन् उच्चाराची नक्कल करीत बंडू चितळे म्हणाला.

"कुठं घेतलीत ?" हा प्रश्न मात्र बंडूनंच केला. नसत्या चांभारचौकश्या करणं हा तर आमचा स्थायीभाव !

" फुले ऽऽऽ मार्केट ?"

" फुलेऽऽमार्केट ? कुठं आहे ते वरं. . . ?"

"ओ ऽऽ! द् ओल्ड क्रॉफर्ड मार्केट !"

"ओ ऽऽ ओ ऽऽ ओ ऽऽ! आय् सी ! आय् सी!" बंडू मान डोलावीत साहेबी थाटानं म्हणाला साहेबानं आपल्या देशातल्या वस्तूंची अन् वास्तूंची तपशीलवार माहिती द्यावी हे आजवरच्या परंपरेला धरूनच होतं ।म्हणा !

" हाऊ अमेझिंग् ? आपल्या बॅग्ज् कशा अगदी त्याच आहेत नाही ?"

" होय ! माणसांसारख्याच बॅग्ज्. . . सारख्याच !"

" ओ नो ऽऽ! सारख्या असाव्यात . . .पण नसतात . . . नसतात वरं !" पुणेरी टोमणा मारीत बंडू म्हणाला . . .तो समजला नि त्याने आपले खांदे घुसळविले !

शंभर लोकांचा एकदम गळा दावला तर जसा आवाज येईल तितकाच कर्णकर्कश, घुसमटलेला आवाज काढीत गाडी हलली !

गाडीची खडखड आणि त्यांचं संभाषण एकाच वेळी जोरावलं. हातातली बॅग् घेऊन बंडू त्याच्या बाजूला बसला.

त्यांच्या गप्पा खूप, खूप रंगल्या. कॅन् कॅन् पासून फरग्पर्यंत, आईस्क्रीमपासून हिमालयापर्यंत, वर्णद्वेषापासून गांधीवादापर्यंत ! मध्येच प्रणय, ड्रिंक्स्, मुली, स्त्रीसौंदर्य, सुगंध हेही विषय गार झुळकीसारखे येऊन गेले. गाडी बोगद्यात आल्यावर हे विषय जास्तच रंगायचे !

तो अमेरीकन् होता एवढंच काय ते बंडूला उमजलं होत. कुणीही आपापली नावं सांगितली नाहीत नि कुणी ती विचारलीही नाहीत.

प्रवासातल्या ओळखी स्नान करताना अंगाला लागलेल्या साबूच्या फेसासारख्या!

दरम्यान दोघानीही आपापल्या बॅग्ज् सीटखाली ठेवल्या !

पुण्याहून मुंबईला परतणाऱ्या माणसाची अशीही एक समजूत झालेली असते की आपण कर्जतला आलो की हाकेवरच आलो . . . कल्याणला आलो की घराच्या परिसरातच पोचलो नि ठाणं गाठलं की उंबरठ्यावरच पाय ठेवला ! कुर्ल्यानंतर मात्र माणूस उगाचच अस्वस्थ होतो नि घड्याळाकडं सारखा बघत रहातो.

व्ही. टी. ला गाडी धीमेपणानं थांबली . . . एकशे आठ प्रदक्षिणा घातल्यानंतर, दम टाकण्यास बसलेल्या वृद्धेसारखी ! सातारी मातीत पुष्ट झालेली भरदार मनगटं सामान उचलायला धावली. दोघांची धक्काबुक्की डब्यातच झाली !

"जा साल्या ! हमेश माज्या प्वोटावर येतोस ?

"देन् लाफाऽऽऽ !"

अशा शाब्दिक फुलबाज्या उडाल्या !

एकानं बॅग्ज् घ्यायचा प्रयत्न केला. दोन्ही उचलल्या देखील

" नो ! नो !! नो !!! " साहेबानी नकार दिला.

" नो ! नो !! नो !!! " बंडूनं 'री' ओढली.

हमालानं बॅग्ज् परत केल्या.

"बाय्, बाय् ! टाऽटा ! " झाले. हात हलले नि दोघं खाली उतरले.

साहेब झपझप पुढं गेला. त्याच्या मस्तकाच्या पिंगट ठिपक्याकडं पहात बंडू शांतपणे चालला होता.

" खडे रहो ऽऽऽऽ !"

एक हुकमी आवाज बंडूनं ऐकला. त्यानं दुर्लक्ष केलं.

"खडे रहो ऽऽ !" त्याच्या खांद्यावर कुणीतरी हात ठेवला होता ! त्यानं चमकून मागं पाहिलं.

" क्या . . . क्या बात है ?" उर्मटपणानं बंडूनं विचारलं.

" बात ? बात बित कुछ नहीं !" खोलो ! बॅग् खोलो !"

" नही खोलेगा !"

" क्यों ?"

" तुम् कोन है ?" पुणेरी हिंदी आता उच्चारलं गेलं.

" फिर बताऊंगा ! बॅग् खोलो !" तो दरडावीत म्हणाला.

"अरे ज्या ! हम् लोकक् तुम् क्या मामा समझता है क्या ?"

'यह मामा बिमा क्या है ? ब्यॅग् खोलो!'

"नहीं खोलेगा ? तुम् कौन है ? वाट्टेल तो आदमी हमकु अडवेगा !"

त्यानी बंडूचा दंड धरला !

" चलो ! इन्स्पेक्टर् साहबके पास !"

बंडूलाही खुमखुमी होतीच !

" चलो ! चलो ! तो चलो ! कर नहीं है तो डर काय कु ? ?" बंडू बेफिकीरपणे हसत म्हणाला.

त्या जाड मिशाच्या काळ्याकभिन्न इसमाबरोवर बंडू चालू लागला. बंडूनं विचार केला की हा कोणी गुंड असेल तर आयताच पोलीसाच्या हाती सापडेल ! नसेल तर आपल्याला उगाचच् सतावल्याबद्दल आपण त्याला " असा ज्याम् ! असा ज्याम् ऽऽ" की त्याच्या मिशीचे आकडेच खाली उतरतील.

"सातशे पंच्चेच्याळीस ! काय भानगड आहे ही !"

"बॅग् खोलून दाखवीत नाही !"

"बट व्हाय् ?"

"व्हाय् ? आम्ही बॅग्ज् काय पण कुणाचं तोंडही खोलू शकतो ! ह्य: ह्य: ह्य: !" इन्स्पेक्टर साहेब स्वत:च्याच



# 'हा खेळ सावल्यांचा'

—ज्ञानेश्वर नाडकर्णी

**दोन** वर्षांपूर्वी प्रा० एकनाथ विश्वनाथ जोशी यांची 'काळोखाचे अंग' ही कादंबरी प्रसिद्ध झाली तेव्हाच ती एक श्रेष्ठ कलाकृती म्हणून रसिकांच्या मनात ठसली होती. मात्र सौ० शिरीष पै यांचे 'हा खेळ सावल्यांचा' हे नवे नाटक प्रा० जोशींच्या या कादंबरीवर आधारलेले आहे अशी बातमी प्रसिद्ध झाली तेव्हा आश्चर्य वाटले. 'काळोखाचे अंग'चे नाटकात रूपान्तर होईल असे कादंबरी वाचताना कधीही वाटले नव्हते. कादंबरीत जरी पाचच पात्रे असली तरी ही पात्रे आणि त्यांचे परस्परांशी असलेले संबंध एका आगळ्याच धूसरतेने वेढलेले आहेत. कादंबरीकाराची निवेदनशैली सूक्ष्मता आणि तरलता यांची एक असाधारण पातळी गाठते. निदान माझी तरी प्रतिक्रिया कादंबरीबाबत अशी होती की त्यात अंतःचक्षूंना जे दिसते त्याहीपेक्षा मनाला जे जाणवते ते जास्त स्पष्ट किंबहुना तीव्र असते. एका अर्थाने ही कादंबरी म्हणजे, तिच्या नावासुद्धा, एक काव्य आहे अशी ती वाचून भावना झालेली होती.

आता ही धूसर दिसणारी पात्रे— भोळाभावडा, कामसू, सरळ मनाचा घनःश्याम, तितक्याच सरळ मनाचा व निदानपक्षी प्रेमाच्या प्रांतात तरी भोळसट ठरलेला त्याचा जीवश्चकंठश्च, ध्येयवादी मित्र डॉक्टर मलिन; त्यांचा कॉलेजमित्र आणि त्यांच्यापेक्षा जास्त बेछूटपणे वागणारा, व्यसनी, छंदीफंदी एस्के; या तिघानाही वेगवेगळ्या प्रकारे झुलविणारी सुंदर परंतु कर्तृत्ववान् सुरेंद्रा आणि घनःश्यामवर निष्ठेने प्रेम करून त्याचा संसार फुलविणारी परंतु त्याच आत्यंतिक निष्ठेपायी त्याच्या आणि स्वतःच्या दारुण शोकांतिकेला कारणीभूत होणारी दमयंती ! ही पात्रे रंगमंचावर हाडामासाच्या नटनटींनी साकार करायची म्हणजे ती ढोबळ, बटबटीत होण्याचा धोका नाही काय ?

आपण जेव्हा एखादी कथा किंवा कादंबरी वाचतो तेव्हा त्यातील पात्रे आपल्या मनाच्या रंगभूमीवर विशिष्ट स्वरूपात उभी राहत असतात ! 'काळोखाचे अंग' मधील पाच पात्रे जरी धूसर असली तरी ती कशी दिसावीत, त्यानी कसे बोलावे–चालावे याबाबत आपल्या मनात आपण काही अटकळ बांधतोच. अर्थात् आपल्या मनातील या पात्रांच्या बाह्यरेषा (औटलाइन्स) प्रत्यक्षातल्या माणसांसारख्या रेखीव नसतात. म्हणूनच **'हा खेळ सावल्यांचा'** कसे काय उतरले असेल अन् त्यातील पात्रे मनात कितपत ठसतील याबाबत विशेष शंका !

परंतु प्रत्यक्ष नाटकाचा प्रयोग पाहून या शंका दूर झाल्या एवढेच नव्हे तर कादंबरीचे ( अन् तेसुद्धा दुसऱ्या लेखकाच्या ! ) नाटकात रूपान्तर करताना ज्या अडचणी उद्भवणे अपरिहार्य आहे त्यातील बहुतेकांना त्यांनी चतुरपणे, नेमकेपणे तोंड दिलेले आहे याची प्रचीती आली.

मूळ कादंबरीमध्ये वर उल्लेखिलेल्या पाचही पात्राना सारखेच महत्त्व आहे. कादंबरीचे कथानक काळाच्या दोन पातळ्यांवरून पुढे सरकत असते. घनःश्याम, मलिन, एस्के, सुरेंद्रा व दमयंती ही एकाच कॉलेजात असतात; त्यांच्या कॉलेजातील स्वच्छन्द जीवनाचा व परस्परांच्या तत्कालीन संबंधांचा 'फ्लॅशबॅक' कादंबरीच्या निवेदनात नेमाने डोकावीत असतो. दुसरी पातळी म्हणजे आताच्या काळाची. या पातळीवर जे काही घडते ते कादंबरी व नाटक दोन्हींचा गाभा आहे.

घडते काय ? घनःश्याम व दमयन्ती यांचा संसार अतिशय सुखाने चाललेला असतो— एखाद्या स्वप्नासारखा. आपल्या धंद्यात घनःश्यामने कष्ट करून चांगली बरकत मिळविलेली असते. मलिन मात्र अजून अविवाहित असतो; सुरेंद्रावर कॉलेजच्या दिवसांपासून मूकपणे प्रेम करीत, तिचा छटेलपणा मुकाट्याने सहन करीत ! एस्के आपल्या व्यसनाधीनतेतच खितपत पडलेला असतो. एके रात्री अचानक घनःश्याम व्यभिचाराचे पाप करतो— सुरेंद्राच्या मोहपाशाला बळी पडतो. आपल्या पापाची दमयंतीच्या पुढ्यात कबुली दिल्याशिवाय त्याला चैन पडत नाही आणि जेव्हा तो तसे करतो तेव्हा त्याच्या सांसारिक सुखाला कायमचा तडा जातो. दमयंती त्याला क्षमा करीत नाही; त्यामुळे घनःश्याम आतल्या आत झुरू लागतो. त्या अंतरायामुळे घनःश्याम व दमयंती या दोघांची प्रकृती ढासळू लागते. मलिनच्या मध्यस्थीचा काहीही उपयोग होत नाही.

अखेरीस या दुखण्यातच घनःश्यामचा अंत होतो; त्याने जणू आपल्या पापाचे प्रायश्चित्त दिलेले असते. परंतु दमयंतीसुद्धा त्याच्या पाठोपाठ काही दिवसानी हे जग सोडून जाते. सुरेंद्राला या साऱ्या प्रकरणातील आपल्या जबाबदारीची खंत वाटत असते. कादंबरीच्या ( व नाटकाच्या ) अखेरीला ती गाव सोडून जाताना आपल्याला दिसते.

वरून साध्या दिसणाऱ्या या कथानकाच्या अनुषंगाने प्रा० जोशी यानी त्यातील मानवी संबंधांचा सूक्ष्मतर असा परिपोष केलेला आहे. आपली पात्रे उभी करताना त्यांचे आविर्भाव, त्यांचे शब्द, त्यांच्या सर्व लकबी त्यानी नेमकेपणे आणि जेवढ्यास तेवढ्या आपल्या निवेदनात साकार केलेल्या आहेत. एवढे सर्व करूनही धूसरता आली आहे ती कादंबरीकाराच्या विशिष्ट दृष्टिकोणामुळे ! उदाहरणार्थ, कथानकातील घटना कुठल्या स्थळी घड-







तात, मुंबईला का कुठे बाहेर यावावत आपल्याला मजेदार असा एक संदेह वाटत राहतो. पण यामुळेच कादंबरीतील स्थलवैशिष्ट्याना प्रत्ययकारिता आलेली आहे.

कादंबरीकाराचा दृष्टिकोण त्याच्या निवेदनशैलीतून सहजतः व्यक्त होत असतो. नाटककाराला असे स्वयंपूर्ण साधन नाही. त्याला जे जे काही म्हणून सांगायचे असेल ते ते रंगमंचावरील पात्रांच्या तोंडूनच सांगायला हवे; अन्य मार्ग नाही. नाटकाचा सर्व भर संवादांवर हे लक्षात घेता सौ० शिरीष पै यांचे संवादलेखन पहिल्या दर्जाचे उतरले आहे असे म्हणावेसे वाटते. विशेषतः नाटकाचा पहिला अंक तर इतका अप्रतिम लिहिला गेलेला आहे की केवळ तोच अंक शिरीषबाईनी लिहिला असता तरी नाटककर्त्री म्हणून त्यांच्याविषयी कौतुक वाटल्याखेरीज राहिले नसते. अधिक्षेपाचा दोष पत्करूनही असे म्हटले पाहिजे की आजपर्यंतचे त्यांचे कथालेखन निश्चितच दर्जेदार असूनही इतक्या अस्सल गुणवत्तेच्या अपेक्षा त्यांच्यापासून नव्हत्या !

आपल्या नाटकामध्ये शिरीषबाईंनी दमयंती व घनःश्याम हे जोडपे नाटयवस्तूला मध्यवर्ती कल्पून एकप्रकारे आपली सोय करून घेतलेली आहे. असे करताना कादंबरीतल्यापेक्षा नाटकात सुरेंद्रा या पात्राला जास्त गौणत्व प्राप्त होते. सुरेंद्राच्या अनोख्या स्वभावचित्राच्या साऱ्या 'शेड्स्' नाटकातील सुरेंद्रात आलेल्या नाहीत. (अर्थात् लीला मेहता या अभिनेत्रीला त्या साकार करणे जमलेही नसते !) प्रा० जोशी यांची कादंबरी व शिरीषबाईंचे नाटक यात जवळजवळ एकमेव फारकत आहे ती हीच—परंतु त्यामुळे काही बिघडले आहे असे मला वाटत नाही. उलट नाटकातील पात्रांच्या परस्परसंबंधांचा समतोल राखण्यासाठी कादंबरीतील एखाद-दुसऱ्या पात्राला गौणत्व देणं इष्ट आहे असे म्हणावे लागेल. सुरेंद्रा व एस्के यांचे संबंधसुद्धा कादंबरीत स्पष्टपणे सूचित झालेले आहेत; नाटकात ते तितक्या ठामपणे सूचित करण्यास नाटककर्त्रीला अवसर मिळालेला नाही. कदाचित् यामुळे एस्केच्या स्वभावचित्राच्या मुळातल्या काही 'शेड्स्' नाटकात गहाळ झालेल्या असणे शक्य आहे.

स्वभावचित्रण मुळाबरहुकूम होण्यापेक्षा माझ्या मते जास्त महत्त्वाचे आहे ते कादंबरीतल्या पाच पात्रांच्या परस्परसंबंधांचे नाट्यपूर्ण व रेखीव असे चित्रण ! शिरीषबाईंनी हेच उत्तम प्रकारे केलेले आहे. नाटकाच्या पहिल्या अंकात घनःश्याम–दमयंतीच्या सुखी संसाराचे चित्र मलिन व एस्के यांच्या साक्षीने आपल्या डोळ्यांपुढे ठेवले जाते. मात्र घनःश्यामच्या व्यभिचारामुळे घडणाऱ्या-अखेरच्या शोकांतिकेची पूर्वसूचना नाटकर्त्रीने पडदा उघडता क्षणीच कटाक्षाने दिलेली आहे. नवराबायको बऱ्याच दिवसानी एका सिनेमाला जाऊन आलेली असतात आणि आपल्या प्रेमाबद्दल बोलत असतानाच ती चित्रपटात दाखविलेल्या व्यभिचाराच्या कथानकाबद्दलही तीव्र प्रतिक्रिया व्यक्त करीत असतात ! याच पहिल्या अंकात आपल्याला मलिन व एस्के या दोन पात्रांचीही पूर्ण ओळख होते. घनःश्यामचा सुखी संसार हे सगळे थोतांड आहे आणि एखाद्या परस्त्रीच्या पाठी तो लागल्यास त्याचा संसार उध्वस्त होण्यास वेळ लागणार नाही असे भाकीत कडवटपणे करण्यास अंकाच्या अखेरीस मलिन चुकत नाही.

'फ्लॅशबॅक्स'करवी पात्रापात्रांच्या संबंधांवर जास्त मोठा प्रकाशझोत टाकण्यास सुरुवात याच अंकात होते. कादंबरीतील काही प्रसंग नाटककर्त्रीने या 'फ्लॅशबॅक्स'साठी किती चोखंदळपणे निवडून घेतलेले आहेत हे पाहण्यासारखे आहे. सबंध कादंबरीत पात्रापात्राच्या तोंडी विखुरलेले संवादसुद्धा शिरीषबाईंनी मोठ्या कौशल्याने हवे तेथे एकत्र गुंफलेले आहेत. एवढेच नव्हे तर पुष्कळदा मूळ संवादांचा आशय कायम ठेवून ते रंगमंचाच्या ढोबळ माध्यमाला शोभतील अशा वेगळ्या भाषेत उतरविलेले आहेत. ( उदाहरणादाखल नाटकातील एस्केच्या तोंडचे संवाद पाहावेत. ) क्वचित् त्यानी छोट्या व मोठ्या स्वगतांचाही कौशल्यपूर्ण उपयोग केलेला आहे. ही स्वगते नाटकात जागोजागी नैसर्गिकपणे अवतरतात. ( एस्केच्या अखेरच्या स्वगतात कादंबरीत त्याच्या तोंडी इतरत्र असलेले संवाद किती खुबीदारपणे योजलेले आहेत ते पाहा! )

नाटकाचा दुसरा अंक घनःश्याम व सुरेंद्रा यांच्या एका रात्रीच्या व्यभिचारावर आपले लक्ष केंद्रित करतो. जे होते ते अचानक, अपेक्षा नसताना परंतु अटळपणे, अघोरीपणे होते. घनःश्यामची मनःशांति त्यामुळे इतकी ढासळते की तो आपल्या व्यवसायाकडे, आपल्या प्रकृतीकडे दुर्लक्ष करू लागतो. याच अंकाच्या शेवटी तो दमयंतीकड आपल्या पापाची कबुली देतो, परंतु तिच्या पोटी क्षमा नसते. घनःश्याम व दमयंती यांच्या स्वप्नमय, सुंदर संसाराचा या अंकाच्या अखेरीस कायमचाच जणू शेवट झालेला असतो.

हे सत्य तिसऱ्या अंकात एका फ्लॅशबॅककरवी आपल्यापुढे मांडले जाते. निदान या एका फ्लॅशबॅकला तरी प्रधान रंगमंचावरील एखाद्या घटनेची तीव्रता, जळजळीतपणा लाभलेला आहे. (एकतर त्यातील पात्रे -- घनःश्याम, दमयंती—ही आतापर्यंत प्रधान रंगमंचावर वावरत होती !) त्यामुळे तो पिछाडीच्या दुय्यम रंगमंचावर प्रयोजित केला जावा हे खटकते. अर्थात् तिसऱ्या अंकात प्रधान रंगमंचावरील मध्यवर्ती पात्र सुरेंद्रा हे असल्यामुळे घनःश्यामच्या मृत्यूची घटना दुय्यम रंगमंचावर फ्लॅशबॅकद्वारे रंगविली जावे हे अपरिहार्यही होते. येथे नाटककर्त्री रचनेच्या एका कोडयात सापडलेली आहे. !

तिसऱ्या अंकात प्रथमच प्रकाशझोत सरळ सरळ पडतो तो सुरेंद्रावर ! ती आता व्यथित अंतःकरणाने गाव सोडून जायला निघालेली आहे. प्रेक्षकाला माझ्या समजुतीप्रमाणे आता तिच्याबद्दल सहानुभूती वाटत असते—किंबहुना दुसऱ्या अंकात जेव्हा तिने घनःश्यामला दारू पाजून आपल्या जाळ्यात ओढले तेव्हासुद्धा घनःश्यामबद्दल सहानुभूती वाटणारा प्रेक्षक सुरेंद्राला काही खलनायिका वगैरे मानीत नाही ! मूळ कादंबरी वाचलेल्याना सुरेंद्राचे स्वभावचित्र चारदोन विशेषणांमध्ये पकडावयास किती कठीण आहे हे माहीत असेलच. नाटकातील सुरेंद्रा जर जास्त मुळाबरहुकूम असती तर दुसऱ्या अंकात ती जे करते ते तिच्या बाबतीत अनैसर्गिक तरी नाही एवढे आपण म्हटले असते. ( प्रा० जोशीना अर्थातच् हा व्यभि-








चाराचा प्रसंग यथास्थित रंगविण्यास पुरेशी पृष्ठे लाभलेली आहेत ! नाटककर्त्रीला तो एका फ्लॅशबॅकमध्ये आणि म्हणूनच संक्षेपाने, उरकून घेणे क्रमप्राप्त झालेले आहे ! )

' हा खेळ सावल्यांचा'चा तिसरा अंक केवळ एक 'समिंग-अप' आहे. त्यात कथानक पुढे सरकते ते मुख्यतः मलिनच्या बाबतीत. अजूनही सुरेंद्रा त्याला लाभलेली नाही ! तो जणू निरीच्छ वाटावा असा काठावरच उभा आहे ! मलिनचे स्वभावचित्रण या नाटकात अतिशय सखोलपणे झालेले आहे. ( मलिन घनःश्यामला आपल्या एका म्हाताऱ्या पेशंटची गोष्ट सांगतो तो मनोहर क्षण शिरीषबाईंनी सुंदर पकडलेला आहे ! ) मलिन हा एका दृष्टीने नाटकातल्या इतर चारही पात्रांकडे —सुरेंद्राकडेसुद्धा! — तटस्थपणे पाहू शकणारा माणूस आहे. शिरीषबाईंच्या नाटकातील एखाद्याच उच्चांकाकडे बोट दाखवा असे जर मला कोणी सांगितले तर मी त्यांच्या मलिनकडे बोट दाखवीन—तो जितका प्रा० जोशींचा आहे तितकाच त्यांचा आहे !

नाटकाच्या प्रयोगाचे दिग्दर्शन सौ० शिरीष पै यानीच केलेले आहे आणि ते बव्हंशी परीटघडीचे आहे. यातील भूमिका एरवीच्या मराठी नाटकातल्यापेक्षा कितीतरी जास्त प्रगल्भ, परंतु बहुतेक कलावंतांनी हे आव्हान यशस्वीपणे स्वीकारलेले आहे. कुमार दिघे आणि सौ० कुसुम कुलकर्णी यानी घनःश्याम–दमयंती यांचे प्रेमजीवन पहिल्या अंकाच्या सुरुवातीला निःसंकोचपणे अभिनयांकित केले. अत्रे थिएटर्सच्या 'मोरूची मावशी'मध्ये ज्यानी कुमार दिघ्याना पाहिले असेल त्याना त्यांच्या आजच्या अभिनयातील समंजसपणा व प्रौढता जाणवल्याखेरीज राहणार नाही. सतीश दुभाषी यानी स्वीकारलेली मलिनची भूमिका त्याना आजपर्यंत मिळालेल्या भूमिकांपासून पूर्णपणे वेगळी आहे आणि तरीही सहजतापूर्ण संवादोच्चार आणि प्रयासहीन 'बेअरिंग' यांच्या द्वारे ते ती उत्तम प्रकारे वठवितात. मात्र होते काय की पहिल्या अंकात दारुड्या–एस्केच्या भूमिकेत अरुण सरनाईक यानी प्रवेश केला की इतर नटांच्या अभिनयाचे 'इंप्रेशन' साफ पुसून जाते ! आपल्या दारुड्या–छापाच्या बोलण्याच्या वास्तववादी ढंगाने सरनाईक सबंध नाटकभर या भूमिकेत आगळाच रंग भरतात. तिसऱ्या अंकातील त्यांचे आत्मगत—विशेषतः त्यातील काल्पनिक आरशासमोर उभे राहून म्हटलेला भाग—प्रेक्षकांच्या दीर्घकाल स्मरणात राहील !

मलिन हे स्वभावचित्र जितके तरल तितकेच एस्के हे ठाशीव. परंतु शिरीषबाईंनी दोन्ही सारख्याच कौशल्याने रेखाटलेली आहेत. त्यांच्या नाटकाच्या जाहिराती जेव्हा पाहिल्या तेव्हा अशी कल्पना होती की एस्केची भूमिका सतीश दुभाषी करतील ( कारण प्रा० जोशींच्या कादंबरीतील एस्के पाहून दुभाषी डोळ्यांपुढे उभे राहतात )! असो. आहे त्या भूमिकायोजनेतही दोघेही नट पहिल्या प्रतीचा अभिनय डोळ्यांपुढे ठेवतात.

सुरेंद्राच्या भूमिकेसाठी लीला मेहताऐवजी आधुनिक पठडीतल्या एखाद्या नटीची योजना व्हावयास हवी होती. शिरीषबाईंनी जरी प्रा०. जोशी यांची सुरेंद्रा शंभर टक्के आपल्या नाटकात उतरविलेली नसली तरी जी आहे तिलासुद्धा लीला मेहता यांच्या हातून न्याय मिळत नाही— त्यांच्या परीने प्रयत्नाची शिकस्त होत असूनसुद्धा ! ही भूमिका इतर भूमिकांइतकीच कठीण आहे आणि आधुनिक पठडीतल्या एखाद्या नटीलाही ती तशी वाटली असती.

तिसऱ्या अंकातील फ्लॅशबॅकमध्ये कुमार दिघे आणि सौ. कुसुम कुलकर्णी यांचे शोकात्म अभिनयाचे कसब पणाला लागते. या कसोटीला ही दोघेही फार चांगल्या प्रकारे उतरतात; विशेषतः भग्नशेष अशा दमयंतीचे चित्र थोडक्या अवकाशात सौ० कुलकर्णी समर्थपणे उभे करतात.

घनःश्याम–दमयंती यांच्या बंगल्याचा सेट आणि त्याहीपेक्षा फ्लॅशबॅकमधील औटडोअर व इनडोअर सेट्स रघुवीर तळाशीलकरानी कसबीपणे उभे केले आहेत. पार्श्वसंगीत काही ठिकाणी आवश्यक वाटते ( उदा० मलिन एक काव्यात्म वर्णन करतो त्यावेळी ); परंतु हृदयनाथ मंगेशकरांची स्वररचना आहे आकर्षक. दुसऱ्या अंकातील फ्लशबॅकमधील सुरेंद्राच्या बेडरूममधील प्रवेशासाठी त्यानी योजलेले पार्श्वसंगीत विशेष अर्थपूर्ण व नावीन्यपूर्ण आहे.

नाटक पहिल्या दर्जाचे, प्रयोग उत्तम असे असूनही सामान्य मराठी प्रेक्षक त्याचे चीज करणार नाहीत, हे निश्चित् ! म्हणूनच या धाडसाबद्दल संबंधितांचे हार्दिक अभिनंदन ! ●●●






अनुक्रमणिका





( पृष्ठ १० वरून–याला जीवन . . . )
नाही. ठीक. . . . " एवढे सांगून त्यानी ती फळे लुटण्याचा कार्यक्रम शांतपणे आटोपला. त्याचा परिणाम एवढाच झाला की दौऱ्यावरुन परत आल्यानंतर माझ्या 'हूर'ची समजूत काढता काढता नाकी नऊ आले. या बायका कोठे कशासाठी रुसतील याचा पत्ता ब्रम्हदेवाला तरी लागला आहे काय . . . ?

१९४४ साली आराकान व आताच्या नागा राज्यातील इंफाळ टेकड्यांच्या आसपास भीषण युद्ध सुरू होते. आणि तेथे लढावयाचे होते, आमच्याच हाडामासाच्या आझाद हिंद सेनेविरुद्ध. माझी त्या ठिकाणी नेमणूक झाली. तेथे गेल्या गेल्या समजले की जनरल भोसले त्यांचे नेतृत्व करीत आहेत. . . क्षणभर वाईट वाटले . . . कारण भोसले माझ्याच पलटणींतील व माझे एकवेळचे वरिष्ठ होते. परंतु कर्तव्य, शिस्त यानी बनलेले जवानाचे मन साऱ्या मोहपाशाना शत्रुमित्र विवेकाने तोडून टाकते आणि जपान आमचा शत्रू. सुभाषबाबूनी स्वातंत्र्यासाठी त्याचे साहाय्य घेतलेले. भावना आणि बुद्धी यांचा तीव्र संघर्ष माझ्या सारख्या काही 'बाहेरचे वारे' लागलेल्यांच्या मनात सुरू झाल्यास नवल ते काय ? अखेर कर्तव्याने भावनेवर मात केली. भारत स्वतंत्र व्हावा असे आम्हालाही मनोमनी वाटत होतेच की ; परंतु त्यातल्या त्यात नाही म्हटले तरी असेही वाटत होते की फॅसिस्ट जर्मनी व जपानच्या नादी लागण्यापेक्षा सुभाषबाबू ब्रिटिशांच्या शुद्ध प्रयत्नास साहाय्यक ठरते तर दुसरे महायुद्ध संपल्यानंतर त्याचा फायदा नक्कीच झाला असता. कारण ते १९४४ साल होते. जर्मनीचे कंबरडे खचत चालले होते. दोस्तांचा विजय होण्याची खात्री ठामपणे निर्माण झालेली होती. दुसऱ्या टोकाला जाऊन विचार करावयाचा तर युद्ध समाप्तीनंतर चर्चिल वा कोणत्याही ब्रिटिश सरकारने भारताला स्वातंत्र्य नाकारले असते, तर सबंध भारतीय सैन्य, नौदल व हवाईदल सुभाषबाबूंच्या एका हाकेसरसे बंड करून उठले असते. फाळणी टळली असती . . आणखीही पुष्कळसे घडले असते . . . परंतु असे देवाजीच्या मना . . . हेच खरे.

तर सांगत काय होतो की इंफाळच्या रणांगणावर पोहोचण्यासाठी उथळ होड्यातून मी माझ्या युनिटसह ब्रम्हपुत्रा ओलांडली . . खूपच खूप रुंद असलेले ब्रम्हपुत्रेचे पात्र, नाना प्रकारच्या होड्या, पडाव, मचवे, लाँचेस, लहान आगबोटी यानी खच्चून भरले होते. सर्वाआधी अन्नधान्य व दारुगोळा यांची वाहतूक करणाऱ्या पडावाना प्रवाह खुला करून द्यावा लागत असे. मग सैनिकांचे पडाव पाणी कापू लागत. लढाईत तावून सुलाखून निघालेले मराठे जवान वैतागले होते. कारण अनेक ठिकाणी जपानी सैनिक आमच्या ( दोस्त सेना ) सैनिकात सावधपणे, बेमालुमपणे घुसून लुटालूट व कापाकापी करीत असत. अखेर एकदाचे आम्ही मोर्च्यावर पोहोचलो, व खंदकात जाऊन ठाण मांडले. आणि त्याच ठिकाणी इंफाळला विमानाने जाण्याची वाट बघत असताना लो. टिळकांचे गीतारहस्य अत्यंत एकाग्रतेने वाचण्यास मी प्रारंभ केला. वेळ जाण्याचे एक साधन म्हणून तो ग्रंथ मी मुद्दाम मागून घेतला होता. तब्बल तीन महिने अभ्यासिला. इंफाळमध्ये पोहोचून लढाईचे घुमश्चक्रीत मी केव्हा पडतो या उत्सुकते पाठीमागचा मानसिक ताण, तसेच मलेरिया, डास, गळवा या शारीरिक तापांवर तो एक रामबाण उपाय ठरला. मी स्वतः आजारी पडलो नव्हतो. पण सैनिकांपैकी पुष्कळांचे बळी त्या आजाराने घेतले होते. दलदल, चिखल, मुसळधार पाऊस, कधीतरी सूर्यदर्शन हिंस्त्र श्वापदानी भरलेली घनदाट अरण्ये, साप, व अजगरांचा सुळसुळाट आणि भरीत भर अहोरात्र जपानी व आझाद हिंद सैनिकांच्या छुप्या छाप्यांची धास्ती. गीतारहस्यामुळे त्या गुदमरलेल्या वातावरणातून मिळेल तितकी मुक्ती मी मिळवीत होतो. डोक्यावर जपानी बाँबर्स घरघरताना खंदकात लपल्यावाचून दुसरा इलाजच कोणता? त्याही वेळी गीतारहस्य वाचणे व बाँबवर्षाव विसरणे हे साधले होते.

कोहिमा हिल पुन्हा जिंकून घेण्यापूर्वी दोन्ही बाजूनी वाहणारे रक्ताचे पाट माझ्या साक्षीने मातीत जिरत होते. सन्मान आणि मुक्तीसाठी एकमेकांचे जीव घेणारे ते सैनिक आणि शेजारीशेजारीच पडलेली दुष्मनांची कलेवरे यातून जन्म, कर्म, मृत्यू व मोक्ष यांचेच दर्शन घडत होते. नि मी ते निर्विकार, निरासक्त मनाने तटस्थपणे पहात होतो. पण अखेर इंफाळचे युद्धभूमीचे दर्शन घेतल्या शिवायच मला क्वेटा येथे जावे लागले.

१९४५–४६ ही वर्षे मी इराक व इराण येथे काढली. तेथील दरिद्री जनतेला आपापल्या परीने शक्य तितकी मदत करणारे सर्व राष्ट्रांचे व रंगांचे सैनिकही तेथेच दिसले. लहान पोरांशी त्या जवानांची गट्टी तर चटकन जुळत असे. कारण त्या पोरांमध्ये आपल्या पोरांचे रुपडे ते जवान बघत होते. दाटलेल्या वात्सल्याचा बांध फुटून दुतर्फी वहात होता. त्यावेळी तेथील कुर्दी टोळ्या स्वातंत्र्यासाठी लढत होत्या. त्यांचेशी गप्पा मारताना भारतीय स्वातंत्र्यलढ्याविषयी त्यांचेकडून प्रकट होणारी आस्था एकाच गोष्टीची ग्वाही देत होती. दोन गुलामच परस्परांच्या स्वातंत्र्यलढ्याला साथ देऊ शकतात. कारण त्याचे महत्त्व गुलामच अधिक चांगल्याप्रकारे जाणू शकतात. आणि एक दिवस असा उजाडला की आझाद हिंद नेत्यांच्या खटल्यांची गोष्ट मेसमध्ये निघाली. जनरल भोसले, कॅप्टन शाहनवाजखान व कॅप्टन धिल्लन यांचेवर दिल्ली येथे राजद्रोहाचा खटला सुरू होता. युद्ध संपलेले होते. साहजिकच युद्धकालीन ताण नाहीसा झालेला होता. मायदेशी परत जाण्याची प्रतीक्षा करीत आला दिवस आम्ही घालवीत होतो. अशा बऱ्याचशा मोकळ्या वातावरणात गप्पा सुरू होत्या. मी होतो स्टाफ ऑफिसर. आमचा ब्रिगेड कमांडर होता ऑस्ट्रेलियन.

त्याने सरकारची बाजू उचलून धरली. तेव्हा मी ताडकन् उसळून सांगितले की, 'यावेळी ब्रिटिशानी करण्यासारखी एकच चांगली गोष्ट असू शकते. '

' कोणती '?

'भोसले, शहानवाज, धिल्लन व त्यांच्या साथीदाराना बिनशर्त सोडून देणे.' हे उत्तर ऐकताच तो अवाकच झाला . . . आणि तो वाद तेथेच तुटला.

१९४६–४७ साली सेवामुक्त जवानांच्या पुनर्वसनाचे कामी माझी नेमणूक झाली. सेवामुक्त जवानांच्या सहकारी संस्था तसेच रोगमुक्त होणाऱ्या जवानांसाठी

( पृष्ठ ५७ वर पहा )





[पृष्ठ ४७ वरून-युद्धः साडी आणि परॉंकिचे]

"ओ नो ! एक मठ्ठ भारतीय मात्र भेटला !" वरकरणी सहज विचारलेल्या तिच्या प्रश्नामागं आपल्या पत्नीचा संशय आहे ह्याची त्याला जाणीव होती.

तिनं बॅग् आतल्या खोलीत ठेवली. तो कपडे बदलीत होता. चावी मागून तिनं बॅग् उघडली मात्र नि तिनं एक अफाट किंकाळीच मारली.

"ओ नो ऽऽऽ" जॅकलिन् केनेडीच्या आर्ततेनं ती किंचाळली.

दचकून त्यानं तिकडं पाहिलं. त्याचंही तोंड आश्चर्यानं वासलंच !

एक सुंदर रेशमी साडी नि त्याच रंगाचा ब्लाऊज् पीस झगमगत होता !

"यू ! यू ! अन् फेथ् फूल् ! डर्टी डॉग्! मला, मला वाटलंच ! मला वाटलंच होतं ! म्हणूनच मी विचारलं हं आत्ताच ! कुणी मस्त छोकरी भेटली की नाही ? तर मार-तोस थापा की ओ नो ! एक मठ्ठ भारतीय मात्र भेटला ! अरेच्च्या ! हा..हा तुझा मठ्ठ भारतीय साडी नेसतो काय ? त्याला ब्लाऊज् पीस् लागतो काय ? बोल ! बोल ! कोण ...... कोण ती छटेल पोरगी ? पुण्याला मजा मारलीत काय ? ओ नो ऽऽऽ ! मला...मला घटस्फोट घेतलाच पाहिजे ...मला घटस्फोट घेतलाच् पाहिज..." एवढं बोलून ती ओक्साबोक्शी रडू लागली !

तो गारठलाच होता. तिच्या जवळ जाऊन त्यानं तिच्या पाठीवरून हात फिरविला. तिनं तो झिडकारला.

"अग, पण ती बॅग् माझी नाही ! "

"व्हाट् अ लायर् ? हीच ... हीच आपली बॅग् ! चावी लागते ! अन् पुन्हा माझ्या तोंडावर धादान्त खोटं बोलतोस ? डेव्हिल् !" त्या पुनश्च मोठमोठ्यानं रडू लागल्या !

त्यानं तिला दोन्ही बॅगज् सारख्या कशा होत्या वगैरे सर्व समजावून सांगायचा प्रयत्न केला ! पण छे ! रडणं नि किंचाळणं. हातपाय आपटणं नि शिव्यांची लाखोली सारखी चालूच होती.

त्यानं बॅग्च्या आतल्या कप्प्यात हात घातला. त्याचा चेहरा उजळला. त्याला हवं ते तियं मिळालं— वंडू चितळेचं व्हिजि-टिंग् कार्ड ! क्षणात तिची खात्री पटली. मग ती खो खो हसत सुटली. वटवृक्षाला पुनश्च पारंव्या आल्या नि चांगल्याच हिंदकळल्या ! "माझे पेपर्स मला परत मिळ-विले पाहिजेत ! गुड् ! त्याच्या घरी फोन् आहे ! तो फोन्कडे धावला !

* * *

"इन्स्पेक्टर्साहेब ! झाला एवढा विनोद पुरे झाला ! मला माझ्या घरी फोन् करू द्या !"

"म्हणजे ?"

"माझा फ्लॅट् मुंबईतच आहे ...!

"ओ. के. गो अहेड् ! " चेहरा फाडीत इन्स्पेक्टर् म्हणाले—

"हे बघा ! स्टॉप् ! मला नंबर सांगा ! मी बोलतो त्यांच्याशी !"

"ओ. के. ! गो अहेड् ! " नंबर सांगितल्यावर वंडू त्यांच्याच आवाजात म्हणाला.

"मी इन्स्पेक्टर् सावंतसाहेब ! आपण असाल तशा या इथं ! तुमचे यजमान संक-टात आहेत! समजलं? असाल तश्शा या." एवढंच बोलून त्यानी फोन् खाली ठेवला.

बिच्याऱ्या सुनेत्राबाई ! जीवाचं पाणी, पाणी झालं त्यांच्या !

"विठू ! मी जाऊन येते व्ही. टी.च्या पोलीस् स्टेशन्वर ! नीट घर संभाळ !"

"पोलीस ठेसनावर ?"

"हो ! व्ही. टी. च्या !"

त्यानी कशीबशी साडी गुंडाळली. टॅक्सी पकडली नि धडपडत त्या निघाल्या.

"छे बाई ! कसलं बरं संकट देवा ! अपघात ! अगबाई ! देवा ऽऽ ! अपघात तर नाही ?" ह्या विचारनंच त्या थिजल्या.

अपघात नसेल ! असता तर थोडी तरी त्यानी कल्पना दिली असती बाई ! एखाद्या बाईची भानगड ! आँ ... ! अशक्य नाही हे हे मेले सगळे पुरुष इथून तिथून सारखेच ! आता हे नाहीत त्यातले ! पण काय सांगावं? एखादी उनाड मैना त्याना भेटलीही असेल! आजकालच्या बायका ... !"

व्ही. टी. ला. टॅक्सी थांबली. जवळ जवळ पळतच त्या पोलीस् स्टेशनात धापा टाकीत शिरल्या.

उघड्या बॅग्मधला तो पाश्चिमात्य स्त्रीवेष पाहून तर त्यांचं डोकंच भडकलं ! आपण पोलीस् स्टेशनात आहोत ह्याचंही त्याना भान राहिलं नाही !

"मला वाटलंच होतं तसं ! म्हटलं भेटली असेल एखादी उनाड मैना ! वा ! आणि आंग्लयुवती काय ? छान ! मोठा मजा आला असेल ! शरम नाही वाटत ? हुं : ! माझंच दैव खोटं." असं बोलून त्या खुर्चीत धाडकन् कोसळल्याच !

* * *

"चल ! चल ! घरी कोणी दिसत नाही त्यांचा सर्व्हंट येवढंच बोलला ना ? व्ही. टी. पोलीस स्टेशन, तो तियंच असला पाहिजे. "

बेफामपणे त्यानं मोटर हाकली. धड-धडत ते तियं आले.

"हॅलो ! मि. चित ऽऽ ले ऽऽ !'

"हॅलो !"

"ओ ! व्हाट् अ टेरीबल् मेस् ? तो अमेरीकन म्हणाला.

"ही ... हीच का ती मेली ?" वंडूच्या वायकोनं मराठीत विचारलं.

"त्याची ती वायको आहे ! जरा जपून बोला ... आता तरी !" वंडू वैतागून म्हणाला.

"हीच ... हीच माझी बॅग् ! अन् हे माझे प्लॅन्स !"

"कसले प्लॅन्स् ?" सावंत साहेवानी विचारलं.

"फॅक्टरीचे ! मुंबई-पुणा रोडवर आम्ही मोठी फॅक्टरी बांधीत आहोत !" खिशातलं कार्ड देत तो म्हणाला.

"ॲण्ड हिअर ईज युवर्स !" वंडूची वॅग त्याला देत तो हंसत म्हणाला.

आजवर कधी झाला नाही एवढा प्रचंड हास्यस्फोट त्या पोलीस चौकीत झाला !

पारंव्या पुनश्च हिंदकळल्या !!!

●●●








## मधाळ गायक

# सुधीर फडके

'सुरासुरातुनि बरसे अमृत"
असं सार्थ अभिमानाने ज्यांच्या गायकीबद्दल आणि संगीत–दिग्दर्शनाबद्दल म्हणता येईल अशा गायक-दिग्दर्शकात सुधीर फडके यांचा समावेश करावाच लागेल. सुधीर म्हणजे सुधा, सुधीर म्हणजे भावस्पर्शी गायन, सुधीर म्हणजे मूर्तिमंत गोडवा, सुधीर म्हणजे रसोत्कर्ष साधणारा सुर साधक, सुधीर म्हणजे मूर्तिमंत तपश्चर्या, सुधीर म्हणजे शालीनता, सौजन्य, विनयशीलता, निरहंकारिता, सुधीर म्हणजे ध्येयवादित्व, सुधीर म्हणजे भावपूर्ण गायकी आणि भावपूर्ण जीवनाचा एक गुणी उपासक. सुधीर म्हणजे एक अबोल पण सतत फुलत, बहरत आलेले व्यक्तित्व असं खात्रीने म्हणता येईल. महाभारत रचायला व्यास लागतो, गीता सांगायला श्रीकृष्ण लागतो, रामायण रचण्याचा अधिकार वाल्मिकीचा. गीतेचे भाष्यकार व्हावे लोकमान्यांनीच तसेच एक समीकरण अलीकडच्या काळात रूढ झाले आहे. गीत रामायण लिहावे ग. दि. मा. नी आणि गावे सुधीर फडके यानीच! गीतरामायण हे काव्य नाही, तो एक चमत्कार आहे. आणि गीत वाचता वाचताच त्याची अवघी चाल मनात साकार करू शकणारा सुधीर फडके हाही एक चमत्कारच ! गीतरामायण व्हावे 'हे तो श्रींची इच्छा' हेच खरे ! पुन्हा ते होणे नाही, तसे होणे नाही ! गीतरामायण ' कसे झाले ' याची सुरस ( व काहीशी चमत्कारिक ) कथा सुधीरच्या तोंडून ऐकण्यासारखी आहे. 'गीतरामायण' हा सुधीरच्या संगीतसाधनेतला शिरपेच आहे. शास्त्रीय संगीत, भाव आणि गीत ह्यांचा अपूर्व संगम म्हणजे गीतरामायण ! गीत रामायण म्हणजे नवरसांचा मूर्तिमंत आविष्कार. त्याला लाभलेले सुरांचे लेणे म्हणजे नवरसांची सुरई ! त्यातली सुधा स्रवते ती सुधीरच्या मुखातून ! म्हणून मग समीकरणे मांडली जातात.

सुधीर फडके यांच्या हातून जे घडले आहे ते मात्र योगायोगाने नव्हे. साधना तर सर्वच कलांच्या बाबतीत करावी लागते. तर तम ठरविण्यात अर्थ नसतो. मोठेपण प्राप्त झाले की, म्युनिसिपालिटीचा कंदिल व गॅसचा दिवा आठविण्याची फॅशन पडून गेली आहे. पण सुधीर फडके यांनी जे आयुष्य काढले आहे त्याचा उल्लेख करताना मात्र ती 'फॅशन' रहात नाही. महाराष्ट्राचा आजचा एक लाडका गायक एकेकाळी 'माझं गाणं ऐकता का हो ?' असे म्हणत दारोदार ( व गावोगाव) फिरला हे कुणाला खरे वाटेल ? "काय द्याल ते द्या अगदी पाच रुपयेसुद्धा चालतील" असे म्हणत कुणी सुचवील त्या 'रसिक' माणसाकडे जात असे ह्यावर आपला विश्वास बसेल ? जेवणा–खाण्याचे वांधे होते. फुटपाथवर झोपावे लागत होते. भाग्य उजळण्यासाठी कलकत्ता येथे सुधीर गेले होते. कधीच परत न येण्यासाठी गेले होते हे ऐकून खरे वाटेल ? पण हे खरे आहे. संगीताचे उपजत अंग लाभलेल्या भाग्यवान कलाकाराचे आजचे यश हे अशा सतत पायपीट, अपमान, हाल, कुचेष्टा, वैताग, आत्महत्येचे विचार, उपेक्षा ह्यातून साकारले आहे. शास्त्रीय संगीताची अंगभूत जाण, पाध्येबुवांचे शिक्षण, बालगंधर्व, हिराबाई बडोदेकर यांच्या गायकीचे संस्कार, आवाजाचे नैसर्गिकरीत्या लाभलेले लेणे, भटकंतीमुळे ऐकायला मिळालेली विविध प्रांतातली गायकी, प्रयोगशीलता ह्यातून आजचे यश 'घडले' आहे. आपण ज्या अवस्थातून गेलो आहोत त्या अवस्थातून जाणाऱ्यांच्या बाबत त्यांच्या मनात अतीव जिव्हाळा आहे. त्यामुळेच फडक्यानी शेकडो कार्यक्रम धर्मार्थ म्हणून दिले आहेत. "माझे संगीत जर मानाने मिरवायचे असेल तर माझ्या समाजाला मानाचे जिणे लाभले पाहिजे" ह्या जाणिवेतूनच समाजसेवा, देशभक्ति या भावनांचा उदय होतो, हया जाणिवेतूनच सुधीर फडके नगरहवेलीमुक्ति संग्रामात 'सक्रिय' भाग घेण्यासाठी प्रसंगी शस्त्रे घेऊन गेले. मोहन रानडेच्या मुक्तीसाठी ते धडपडत आहेत आणि राष्ट्रीय एकात्मता 'बोलून' होत नाही. तिच्यासाठी काहीतरी झीज सोसावी लागते. तो 'स्वभाव'च बनावा लागतो ह्या जाणिवेतून त्यांनी 'नेफा' प्रदेशातला एक 'दीपक' घरी स्वतःचा मुलगा म्हणून ठेवून घेतला आहे. त्या मुलाला लाभलेल्या मायेमुळे व संस्कारांमुळे तो मुलगा उत्तम मराठी बोलतो. शाळेत मराठीत पहिला येऊ शकतो. सुधीर हा तत्वनिष्ठ साधक आहे. तो नुसता स्वप्नाळू, सामाजविन्मुख कलाकार नाही हे सुधीरचे सर्वात मोठे वैशिष्टय आहे असे मला वाटते. संगीताच्या क्षेत्रात येवढे मोठे यश मिळविणारा हा कलाकार संगीताने झपाटलेला नाही हे ऐकून आपल्याला आश्चर्य वाटेल. पण ते खरे आहे. संगीत साधनेतले अनेक कडु-गोड अनुभव पचवूनही फडक्यांचे दिलखुलास हास्य कायम आहे. मनाची कोवळीक, स्वप्नाळूपणा, ध्येयवादित्व. आणि आवाजाप्रमाणेच मनाचा गोडवाही कायम आहे. हे सारे संचित घेऊन ते विदेश दौऱ्यावर जात आहेत. पाश्चात्याना आज भारतीय संगीताचे खूप आकर्षण वाटते आहे. ते आकर्षण वाढेल व स्थिरावेल अशीच कामगिरी ते तिथे करतील ह्याबद्दल शंका नाही. "फुटपाथवरून लंडन–पॅरिसपर्यंत" हा आपला प्रवास सर्व कलासाधकांना मार्गदर्शक ठरो अशी सदिच्छा मी व्यक्त करतो."शुभास्ते पंथानः" यश मिळवून परत या.

तुम्ही येईपर्यंत आम्ही म्हणत राहू "तुझे गीत गाण्यासाठी सूर लागू दे."










## (सदा) रंगरत र. बा. केळकर

**अहमदनगर** येथील एक व्यासंगी चित्रकार, रसिक संगीतज्ञ व साहित्य रसिक श्री. र. बा. केळकर ह्यानी नुक्तीच साठी ओलांडली आणि ते मिशन हायस्कूलमधून निवृत्तही झाले. आधीच झाले. पण काही काही माणसे विशेषतः कलाकार—कधी सेवानिवृत्त वा वयोवृद्ध होतच नाहीत—होऊ शकतच नाहीत असे दिसून येते. नाना केळकर हे असेच एक अखंड उद्योग करणारे, चिरतरुण कलाकार आहेत. वाचत राहतील, चित्रे काढत राहतील, माणसे जमवतील, विविध विषयांवर चर्चा करीत राहतील. त्या विषयात राजकारण असेल, साहित्य असेल, चित्रकला असेल. कलाक्षेत्रात भेटलेल्या माणसांचे विविध अनुभव असतील. कौटुंबिकापासून वैश्विकापर्यंतचे सारे काही असेल. ह्या साऱ्या आठवणीत एक गोष्ट जाणवेल. कलाविषयक उत्कटता आणि प्रामाणिकता ! आपल्या हाताखाली शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांबद्दलची आस्था-आपुलकी व अपार स्नेह ! ह्या भावनेने नाना इतके भारावलेले असतात की, त्यांच्या एकसष्टीचा समारंभ जेव्हा झाला तेव्हा स्वतःचा सत्कार करून न घेता त्यांनी त्या निमित्ताने आपल्या साऱ्या नामवंत व कीर्तिवंत अशा विद्यार्थ्यांचाच सत्कार केला व त्यांना आपल्या वतीने भेटी दिल्या. हे काहीसे जगावेगळे वाटणारे कृत्य करताना सुधारक व काहीशी कम्युनिस्टिक विचारसरणी असणाऱ्या नानांनी शास्त्राधार पाहिला हे त्याहूनही आश्चर्यजनक, आगळेही ! पण नानांच्या मनातला श्रद्धाळू, उत्कट, मनस्वी माणूस कायम आहे म्हणूनच ते चिरनव राहिले आहेत, त्यांचे हास्य विरले नाही. व्यासंग सरला वा ओसरला नाही. साठीच्या वेळीही त्यांना स्मरण झाले ते विद्यार्थ्यांचे ! नाना सिनिक् झाले नाही. 'डावा' कडवटपणा वा रुक्षता त्यांच्यातल्या कलाकारावर मात करू शकली नाही हे माझ्या दृष्टीने फार महत्त्वाचे वाटते—राजकारणी गंभीरता व रुक्षता त्यांनी जवळपासही फिरकू दिली नाही ही गोष्ट अधिक स्वागतार्ह वाटते.

नानांचे वडील होते सब-इन्स्पेक्टर. आई वयाच्या ४ थ्या वर्षीच देवाघरी गेली. पण वडिलांनी बालहट्ट पुरवले. हट्ट तरी कसले ? पशु-पक्ष्यांचे ! मग वडिलांनी, चंद्राचा हट्ट धरणाऱ्या रामाला जसा आरशातला चंद्र दाखवून समाधान केले गेले, त्याप्रमाणे कागदावर बोरुने ती चित्रे काढून पोराचे समाधान केले. त्यातून चित्रकलेची आवड जोपासली गेली. ग्रामोफोनमुळे संगीताची व पशु-पक्ष्यांच्या आवाजाच्या नकला करण्याची सवय जडली. गावोगांवच्या बदल्यामुळे निसर्ग खूप पाहिला. त्यातून चित्रकलेची दृष्टि विकसित होत गेली. पुढे नाना अंमळनेरला गेले. तेथे त्यांच्या व्यक्तित्वाला काही रंग, रूप, आकार लाभला. तेथेच श्री० आठवले नावाच्या 'आर्ट मास्तर' चा व साने गुरुजींचा परिचय झाला. त्यांनी नानांच्या चित्रकलेला प्रोत्साहन दिले. आठवले यांचा व नानांचा स्नेह २५।३० वर्षे टिकून आहे. नानांचा व माझा स्नेहही पंचवीस वर्षांचा आहे. त्यांच्या माझ्या वयात खूप अंतर आहे. व्यवसाय भिन्न. मी मुंबईत तर ते नगरला आहेत. पण 'माणसांचे वेड' हा आणि 'कलांचे वेड' हा आमच्यातला समान दुवा आहे. गेली २५ वर्षे हे स्नेह टिकून राहतात ह्यातच त्यांचे मोठेपणा साठले आहे असे मला वाटते. तसा त्यांचा मित्रपरिवारही मोठा आहे. त्यात शिक्षण संचालक धोंगडे, सर्जन व.म. थत्ते, कलादिग्दर्शक घोडेगावकर, चित्रकलाध्यापक व चित्रकार पिंगळे बंधू ( त्यातले नागेश पिंगळे हे तर आंतरराष्ट्रीय कीर्तीचे चित्रकार आहेत ) यांचा समावेश होतो. ड्रॉइंग हा विषय घेऊन ( ऐच्छिक) नाना मॅट्रिक झाले तेव्हा ते मुंबई विद्यापीठात सर्वप्रथम आले. जे. जे. स्कूललाच केंद्र होते. धुरंधरांनी चित्रे पाहिली. पाठ थोपटली. नानांना ती 'स्मृति' फार मोलाची वाटते. त्यांच्या कलात्मक वाटचालीत अशी श्रद्धाकेंद्रे पुष्कळ आहेत. ' रनवर ' चे रूपांतर 'किर्लोस्कर'मध्ये केले तेव्हा नाना हे 'किर्लोस्कर'चे पहिले चित्रकार होते. पण वाडीची हवा मानवली नाही. नानांनी वाडी सोडली पण ' शं. वा. कि.' ना मात्र सोडले नाही. ' शं. वा. कि. ' हे नानांचे आणखी एक श्रद्धाकेंद्र ! ! द. आ. तिवारींच्या पुस्तकांची मुखपृष्ठे, 'उद्यम'मधील सजावट, बाल मासिकांची सजावट, मौज, विविधवृत्त, चित्रा इत्यादि नियतकालिकातून लेखन केले व चित्रे प्रसिद्ध झाली. ज. द. गोंधळेकर यांचे भरपूर प्रोत्साहन नानांना मिळाले. त्यामुळे १९३४ साली 'अॅडव्हान्स पेंटिंग' मध्ये नाना मुंबई इलाख्यात पहिले आले. १९३५ मध्ये. डी. टी. सीत मुंबई इलाख्यात पहिले आले. १९३७ ला ते 'आर्ट मास्टर' झाले. नगरला त्यांनी मिशन स्कूलमध्ये ३२ वर्षे नोकरी केली. निवृत्तीनंतर प्रगत कला महाविद्यालय ह्या संस्थेची सूत्रे ते सांभाळीत आहेत. कलावंत कधी 'निवृत्त' होत नाहीत ह्याचे उत्तम उदाहरण म्हणजे नाना ! गुणग्राहक वृत्ति, मनस्वी स्वभाव, सुरांचे वेड ( नाना बासरी उत्तम वाजवतात ) माणसांचे वेड. गोष्टी वेल्हाळपणा, आनंदी वृत्ती ( काहीशी 'निलकण्ठ' वृत्ती) ह्यामुळे नाना केळकर हे वर्षानुवर्षे 'मित्र' राहू शकतात. स्नेहबंध टिकतात. त्यांची 'एकसष्टी'ची कल्पना मला हृद्य वाटली. आजच्या जगात फारच आगळी वाटली. आगळ्यावेगळ्या नानांचे मी ह्या निमित्ताने अभिनंदन करतो. दोन मुली, जावई, नातवंडे. एकच पण सुविद्य व कलारत मुलगा ( तोही चित्रकार होऊ घातला आहे ) व संसारात सतत प्रेम व समर्पण देणारी पत्नी नानांना लाभली आहे. माणसाला तरी ह्यापेक्षा अधिक काय हवे असते ?

—आदित्य

## 'खारे' वारे मतलई (की मतलबी) वारे

"संप ! संप ! संप !!" संपाचा पाऊस भरपूर पडणारसं दिसतं आहे. अगदी महापूर येईपर्यंत पडणारसं दिसतं आहे. तसे संप तर नेहमीच होत असतात. कुठे तरी लाल निशाण रोवून अन्यायाचा 'टाहो' फोडीतच असतात.

संप म्हणजे सेन्सेशन !

पण हे सारे संप खरे नाही बरं का ! तूर्तास एक संप चालू आहे तो खरा संप ! संप असावा तर असा. खिशाला त्रास नाही. डोक्याला त्रास नाही. गाडीत वा घरात घसा फोडून चर्चेचा त्रास नाही. जग जिथल्या तिथे आहे आणि आपण आपापल्या जागी-घरात सुखरूप आहोत हे जाणवत राहते. बलात्कार, दरोडे, लूट, युद्ध, एखाद्या साहित्यिकाला झालेली (कसली तरी) बाधा, वगैरे वगैरे तूर्त काही घडत नाही. (निदान कळत नाही). दृष्टीआड सृष्टी म्हणतात. सृष्टी असेलही. पण आमचं कसं झकास चाललय. नाटकाच्या–सिनेमाच्या जाहिराती येत नाहीत (काही बंदही केल्या जातात म्हणे) त्यामुळे 'नवरे' कंपनी वेळेवारी घरोघरी परतत असल्याने गृहखात्याने संप मुदत वाढीची मागणी केली आहे. काहीचे प्रवास झाले. सुखरूप पार पडले. 'स्टेट गेस्ट' म्हणून केलेले प्रवास नेहमीच सुखरूप पार पडतात. पण वर्णने तूर्तास तरी संपादकीय दप्तरात पडून आहेत. बातम्या नसल्याने अग्रलेख नाही. अग्रलेख नाही म्हणून माणसांच्या ज्ञानात नवी भर पडत नाहीय् ! 'रविवारचा पदार्थ' नसल्याने अलिकडे बाँबे बुकडेपो, मॅजेस्टिक बुकस्टॉल वगैरे ठिकाणी महिलांची गर्दी वाढली आहे. 'हजार पाकक्रिया' हे पुस्तक हातोहात खपू लागले आहे. प्रपंच आणि माहेर ही मासिके भलतीच खूष झाली आहेत. 'अन्नपूर्णा विशेषांका'ची दुसरी 'प्रचंड' आवृत्ती निघणार आहे असे ऐकतो. 'पेपर' नसल्याने मासिकांचे खप वाढले असून 'झोपेचे औषध' म्हणून काही चीप (तशा चीऽऽप नव्हेत) एडिशन्स खपल्या असेही समजते. . . रेडियोवरच्या बातम्या ऐकाव्या लागत असल्याने ठिकठिकाणी महापूर आल्याचे समजते. थोडी मनःशांति 'डिस्टर्ब' झाली म्हणून काही माणसे अस्वस्थ झाली असेही ऐकतो. 'संप चालू राहो' अशा प्रार्थना चालू आहेत. एरव्ही काही वृत्तपत्रे मुंबई महाराष्ट्रात निघतात हे कळलेही नसते व त्यांचे 'प्रचंड' खपही झाले नसते. अनेक आत्मे अस्वस्थ झाले आहेत का की त्यांना 'फुकट' (वाचन वा उचापती) काही करता येत नाहीसे झाले आहे. खारट तुरट बातम्या नसल्यानेही काही मंडळी हवालदिल झाली आहेत. 'कोडे' नसल्याने 'स्वस्त' भाग्याच्या शोधात असणारी मंडळी आता 'मटक्या'त हात गुंतवू लागली आहेत. इंदिराजींपासून स्थानीय मंत्र्यापर्यंत वरीचशी मंडळी अस्वस्थ झाली आहेत. 'जनते'ला दिवसातून (निदान) एकदा तरी आपली 'हसरी' छबी दिसावी म्हणून आता खास 'सरकारी' वृत्तपत्रेच निघणार असल्याचे ऐकतो. वृत्तपत्रवाले वारंवार संप करून आपला 'धंदा' विघडवतात म्हणून फिल्मवालेही नाराज झाले असून मुळातल्या समस्यात भर म्हणून की काय एक 'पेपर' काढणार आहेत असेही कळते.

'कॉमनमॅन' मात्र खूष आहे. संसारात 'राजकारण' येत नसल्याने 'कॉमनवूमन'ही खूष आहे. 'अॅटमबॉम्ब' ला प्रतिस्पर्धी 'हैड्रोजन' बॉम्ब्स नसल्याने ते बरेच फुटताहेत. 'आपला वाढदिवस 'चालू' काळात कां हो नाही येत ?' ह्या विचाराने बरेचसे साहित्यिक (वगैरे वगैरे) अस्वस्थही झाले आहेत. पण एकूण 'आल्बेल' आहे. कसं मोकळं मोकळं वाटतं. जगाची (नसती) चिंता डोक्यावर नसल्याने मनमोकळेपणाने हंसता येतं. तेव्हा देव करो आणि (निदान) वृत्तपत्रांचा संप तरी चालू राहो. (हे आपलं तुमच्या आमच्यात. संपबाल्यांपर्यंत पोहचवू नका.)

### नियमन मनुजासाठी

"नियमन मनुजासाठी–मानव नसे नियमनासाठी जाणा" असं केशवसुत म्हणून गेले.

सामान्य माणसाना 'नियमन' असले तरी मंत्री हे 'महामानव' असल्याने (नाही तर ते 'स्वराज्या'तले मंत्री का झाले असते ?) त्याना 'नियमन' असते. त्यामुळे त्यांना 'वाट्टेल ते' बोलण्याचे स्वातंत्र्य असत. त्यांना कायदे अडवू शकत नाहीत. 'पोझिशन' आडवी येत नाही. ती कधी 'डॅम' होत नाही. खुर्च्या कायम राहतात. (ही सोय मोठ्ठी) आणि त्यामुळे 'नियम-न' असलेले मंत्री एकूण (भांडणाच्या) नव्या नव्या सोयी उपलब्ध करून देत आहेत. महाराष्ट्रात तूर्त भांडणाची कारणं कमी घडत



असल्याने गृहनिर्माण मंत्री (गृहनिर्माण हं ! गृहकलह मंत्री नव्हे.) ना. यशवंतराव मोहिते यांनी एक 'कोरे' [तसे कोरे नाही–महाराष्ट्राची 'ह्या' बाबतीतली परंपरा तशी थोर–अगदी शिवाजी राजांचे पायसुद्धा आम्ही मराठ्यांनीच ("व्यापक मराठा") ओढले] कारण दिले आहे. सामाजिक क्रांतीचा मूलमंत्र (सुखाचा मूलमंत्र ह्या चालीवर) त्यांनी सांगितला आहे. वीस वर्षाच्या प्रदीर्घ कालानंतर आम्ही अजून 'जैसे थे' कां आहोत याचे 'गुपित' प्रकटपणे सांगितले आहे. पंडितजींच्या सारखा पुरोगामी, क्रांतिकारक, मॉडर्न नेता लाभूनही, शास्त्रीजींसारखा द्रष्टा, धाडसी, कर्तबगार महामंत्री लाभूनही आणि पित्याचा 'आंतरराष्ट्रीय' वारसा लाभलेल्या इंदिराजी आता पंतप्रधान झाल्या-











अनुक्रमणिका

वरही अजून इथे सामाजिक क्रांति कां झाली नाही ह्याचे 'मूलभूत' (भूत मानेवर बसल्या वर 'मूलभूत' कारणे कशी पटापट सुचतात.) कारण नामदार महाशयांनी सांगून टाकले आहे. ते 'मूलभूत' कारण विचारात घेऊन इंदिराजींपासून तें धनंजयराव गाडगीळांपर्यंत साऱ्यांनी आपापल्या जागांचे त्वरित राजिनामे द्यायला हवे होते ( अजून दिले नाहीत त्याअर्थी त्यांना ह्या देशास सामाजिक क्रांति व्हायला नको आहेसे दिसते). डांगे–एस. एम्. ह्यांनी ' ब्राम्हण्य विनाशक ' गोळ्यांसाठी नामदार महाशयांची गाठभेट घेतल्याचेही ऐकीवात नाही. पुण्याचे 'तेरा ब्राम्हण' महानगरपालिकेच्या खुर्च्या अजून अडवून बसले आहेत. पारशाशी लग्न केल्यानंतर इंदिराजींचे ब्राम्हण्य कायम कसे राहिले आहे ह्या विषयावर ' मौलिक' संशोधन करण्याचे दायित्व एका अब्राम्हण प्राध्यापकाकडे सोपविण्यात आल्याचेही वाजते. . . . जॉर्ज फर्नांडिस हाही मुळातच कुठल्यातरी ब्राम्हण पोटशाखेचा असल्याचीही वदंता पसरली आहे. नंबुद्रीपाद हे शंकराचार्यांच्याच प्रांतातले. तेव्हा एकूण काय ही सारी ब्राम्हण जात जोपर्यंत दिल्लीपासून गल्लीपर्यंतचे नेतृत्व करीत आहे तोपर्यंत ह्या देशात खऱ्या अर्थाने सामाजिक क्रांती होणे अगदीच अशक्य असल्याचा नवा व मौलिक शोध लावल्याबद्दल अखिल भारतीय सामाजिक परिषदेचे यंदाचे अध्यक्षपद ना. मोहिते यांनाच देण्याचे घाटत आहे. गांधी वधोत्तर दंगलीत पुरेशी ' ब्रम्हहत्या' न झाल्याने आता 'सामाजिक क्रांती' चे हे नवे निमित्त ( वा खौलीत) शोधून काढले आहे की काय अशी शंका ( व भीती) व्यक्त केली जात आहे. सर्व ब्राम्हण पुढाऱ्यांना बऱ्याच वर्षांनी त्यांच्या 'ब्राम्हण्या'ची जाणीव करून दिली गेल्याने यंदा ' पंचगव्य' बरेच खपले व जानवी जोडांचा खपही वाढला असल्याची 'बाजारी' गप्प आहे. ब्राम्हण ही जात का वृत्ति ह्या विषयावर एक परिसंवाद सचिवालयाच्या गच्चीवर घेण्यात येण्याचे घाटत असून तिचे संचालन नामदार महाशय करणार आहेतसे ऐकतो. विचार काय मांडला, समाजाच्या दृष्टीने तो कितपत उपयुक्त आहे वगैरे विचारापेक्षा तो 'कोणी' मांडला ह्याला महत्त्व येत असल्याने लेनिन आणि मार्क्स हे मुळात ब्राम्हण कसे होते हे एक नवे संशोधन सुरू झाल्याचेही कळते. शिवाजी हे आजचे (सोयिस्कर) युगपुरुष असले तरी त्यांच्या पदवीतल्या 'गो ब्राम्हण प्रतिपालक' ह्या शब्दसंहितेला आपला तात्विक विरोध असल्याचे नामदार महाशयांनी नामदार मुख्यमंत्र्यांना कळविले असल्याचेही समजते. एकाच दगडात 'गोरक्षा'वाले आणि 'ब्राम्हण' यांना गारद करण्याचे हे महनीय कार्य कसे सहज पार पडते बघा अशा आनंदात मंत्री महाशय मश्गुल आहेत. ( असोत–असोत )

मनात सहज विचार येतो तो असा की, श्रीनगर येथे झालेली एकात्मता परिषद अखेर कुणासाठी भरली ? त्यातले निर्णय कुणासाठी घेतले गेले ? सामान्य माणसासाठीच केवळ ? मंत्र्यांसाठी नाहीत ? 'ब्राम्हण्य' ही जात आहे की ती एक वृत्ति आहे? मी तर माझ्या अनेक वर्षाच्या (अर्थातच ब्राम्हणी–त्याला आता आम्ही काय करणार ? केशवसुत म्हणतात त्याप्रमाणे "आम्ही नव्हतो अमुचे बाप – उगाच का मग पश्चात्ताप ?) अनुभवाने सांगतो की, सामाजिक विषमतेच्या उच्चाटनाबाबत ब्राम्हणांनी जेवढा ( सक्रिय ) पुढाकार घेतला आहे तेवढा इतरांनी क्वचित घेतला असेल. 'हरिजन' ह्या गोंडस नावाने गांधीजीनी ज्या पूर्वास्पृश्यांना संबोधले, त्यांच्या घरादारातून गेली ब्राम्हण मंडळी आणि त्यांना घरात घेऊन गेले तेही ब्राम्हणच ! हरिजनात 'हरिजन'पण आहे. मराठ्यात उच्चनीचपणाचे गंड आजही कायम आहेत. जात पात मोडली आहे ब्राम्हणांनी ( चांगले वाईट हे ज्याचे त्याने ठरवावे हवे तर ) सामाजिक व्यापक बैठक घेतली आहे ब्राम्हणांनी ( आजच्या ) परंतु चार दोन 'बेटी' व्यवहार झाले की क्रांति होते ही क्रांतिकल्पना फारच ढोबळ आहे असे वाटते. सारा समाजच ढवळून निघायला हवा आहे. त्यासाठी असले 'जाती'वाचक वायबार हवेत उडवीत बसण्यात तसा काही अर्थ नाही. आता 'ब्राम्हण्य' ही मागे पडले आहे आणि 'सत्यशोधकी'ही मागे पडली आहे. ती मढी उकरून काढून त्यावर काही 'चांगल्या गोष्टी' भाजून घेता येतील ही कल्पना नामदार महाशयांच्या (पूर्वीच्या) आवडत्या परिभाषेत सांगायचे झाले तर 'बूर्झ्वा' वा 'मध्ययुगीन'च म्हटली पाहिजे. आजचा यंत्रयुगीन मानव इतका बदलत ( वा बिघडत) चालला आहे की त्याला ह्या 'पेटी कन्सिडरेशन्स'कडे लक्ष द्यायला सवड नाही (मंत्र्यांना सवड असते म्हणायची) तेव्हा ह्या निमित्ताने एक विनंति करावीशी वाटते ती अशी की, शिवाजीचे नाव खऱ्या सच्च्या 'मऱ्हाठी' भावनेने आपण घेत असू तर अधिक 'व्यापक' बनू या ! रोटी-बेटी व्यवहार हे कुणी लादू शकत नाही तसेच थांबवू शकत नाही. वरवंटा फिरतो आहे. त्याला फिरू द्या. अमंगळ जळून जाईल. भरडले जाईल ! मंगळ टिकेल. त्याचे पुण्याहवाचन मल्यांसारख्या लोकनेत्यांनी करायचे असते. त्याऐवजी जेव्हा मंत्री नको ते व नको तेव्हा बोलतात तेव्हा असे वाटते की– "नियम न मंत्र्यासाठी" हेच खरे ! !

## दोन महापुरुषांचे महानिर्वाण

वेदमहर्षि पंडित **श्रीपाद दामोदर सातवळेकर** व साहित्याचार्य **बाळशास्त्री हरदास** ह्यांच्या दुःखद निधनाची वार्ता कानी आली आणि मन अस्वस्थ झाले. गेल्याच महिन्यात प्राचार्य सोनोपंत दांडेकर गेले. ह्या तिघाही महापुरुषांच्या निर्वाणाने केवळ महाराष्ट्राचीच हानी झाली आहे असे नाही ! भारतीय तत्वज्ञान, जीवन-परंपरा आणि संस्कृती ह्यांचे थोर उपासक गेल्याने 'भारतीय' हानी झाली आहे. जीवनात काही श्रद्धा असतात, असाव्या लागतात–मूल्ये असतात, निष्ठा असतात. त्या सिद्ध करण्यासाठी काही तपश्चर्या लागते. जीवनभर मनानेच बांधून घ्यावे लागते. गाडूनही घ्यावे लागते ह्या








विचार आज मागे पडत आहे. म्हणूनच अशा पार्श्वभूमीवर वेदमहर्षी वा साहित्याचार्य यांचे निर्वाण मनाला अधिक विषण्ण करते. बुद्धिमत्ता तशी साऱ्यांनाच थोडीफार दिलेली असते. तिला दिशा दाखविणे, गति देणे, तिला श्रम–चिंतनाची जोड देणे व 'कर्तव्य' भावनेने जीवन एखाद्या कार्यासाठी समर्पित करणे, त्या निष्ठा वर्षानुवर्षे जपणे आणि अंती कार्यरत असतानाच मृत्यूला सामोरे जाणे ही गोष्ट दोघांच्याही बाबतीत घडली. पंडित सातवळेकर हे तर आधुनिक योगी–कर्मयोगी म्हणा हवं तर ! त्यांच्या चित्रकलेची, देशभक्तीची आठवण कदाचित राहील–कदाचित राहणार नाही. (कारण तो इतिहास जुना झाला आहे. ) पण महर्षींनी वैदिक वाङ्मयाचे जे भौतिक संशोधन केले व ग्रंथनिर्मिती केली आहे ती येणाऱ्या सर्व पिढ्यांना काही 'नवी दृष्टि' देऊ शकणार आहेत. वेद जुने असले तरी वेदविद्या जुनी नाही. पुस्तके कालपरत्वे जुनी होतातच. पण तत्वज्ञान जुने होत नाही.विद्या जुनी होत नाही.ज्ञान शिळे होत नाही. म्हणूनच पंडितजींचे कार्य चिरंतन टिकेल. 'वेदविद्या'चा अभ्यास सतत होत राहील, अशी ग्वाही त्यांच्या कार्यातून मिळते. ह्या प्रेरणा उत्स्फूर्तच असतात. ही निवड हीही 'स्वाभाविक' असते. पंडितजींचे वेदविषयक कार्यही असेच 'स्वाभाविक' होते. ते योगीच असले पाहिजेत. ९९ व्या वर्षी त्याना मी जेव्हा मुंबईच्या रस्त्यावरून चालत येताना पाहिले तेव्हा मी चकित झालो. त्यांचा तो गोरापान, तुकतुकीत, लाल बुंद चेहरा मला आठवतो. चेहऱ्यावर सुरकुती नाही. तेज रसरसत होते. महर्षी कर्वे यांनाही मी अशाच वयात हळूहळू पावले टाकीत जाताना पाहिले. त्याची मला आठवण झाली. हे आयुष्य लाभले कसे ? निर्व्यसनी व्यक्तित्व हे त्याचे उत्तर आहे. नियमित व शिस्तबद्ध जीवन हे त्याचे दुसरे उत्तर आहे. पंडितजींच्या निधनाने वैदिक वाङ्मयाची फार मोठी हानी झाली आहे. असली कामे केवळ व्यक्तीची नसतात. ते समाजाचे धन असते. पार्डीची त्यांची संस्था हे धन सांभाळील, वाढवील व ती थोर परंपरा खंडित होऊ देणार नाही असा विश्वास वाटतो. पंडितजींच्या स्मृतीला प्रणाम !

बाळशास्त्री हरदास ही भारतीय संस्कृति. वेद वाङ्मय रामायण–महाभारतादि ग्रंथ ह्याचे एक थोर उपासक , थोर प्रवक्ते होते. ते अकाली गेले असेच म्हणावे लागेल. एरव्ही त्यांना पाहिलेला माणूस "ही पोलादी कांब अशी अकाली मोडून पडेल असे वाटले नव्हते" असेच म्हणेल. शरीर श्रमांनी पोखरले गेले होते. मधुमेह जलोदराने ते पोखरले होते. आणि हृदयविकाराचा झटका आला. ते गेले. ते संशोधक भाष्यकार होते. भारतीय जीवन पद्धतीचे व तत्वज्ञानाचे उपासक होते. महाभारतावरील व्याख्याने, रामायणावरील व्याख्याने, श्रीकृष्ण, वेदातील राष्ट्रदर्शन, इत्यादि ग्रंथांमुळे व सत्तावन ते सुभाष, भारतीय क्रांतिकारकांचा इतिहास इत्यादि पुस्तकांमुळे त्यांचे मौलिक विचार आज समाजापुढे आहेत. मूलगामी चिंतन व प्रभावी वाणी–लेखणी ह्यामुळे बाळशास्त्री हरदास ह्या नावाने एक दरारा उत्पन्न केला होता. सावरकर साहित्याचे व तत्वज्ञानाचे तर ते आजचे सर्वश्रेष्ठ प्रवक्ते गणले जात होते. वयाच्या अवघ्या पन्नासाव्या वर्षी हा कर्तबगार कार्यकर्ता निघून जावा हे देशाचे दुर्दैवच मानावे लागेल. आज परकीयांचे प्रत्यक्ष व वैचारिक आक्रमण बलशाही होण्याची चिन्हे दिसत असताना तर ठाम देशहिताची भूमिका घेणारे व ती अत्यंत प्रभावी अशा परिभाषेत मांडणारे लोक हवे होते. बाळशास्त्री अशा काळात अचानकपणे गेले आहेत. सोनोपंत, पंडितजी व बाळशास्त्री ह्या दिघांचेही मृत्यु हा ह्या 'माती'च्या तत्वज्ञानावरील फार क्रूर आघात होय ! हे आघात पचविण्याची क्षमताही ह्या मातीत आहे. पण असे म्हटल्याने आघाताची तीव्रता कमी होत नाही खास !!

'दीपावली' त्यांना श्रद्धांजलि अर्पण करते.

**—सारस्वत**

(पृष्ठ ५१ वरून–**याला जीवन...**)

औद्योगिक प्रशिक्षण केंद्रे यांची योजना व उभारणी करण्यात मीही माझ्या परीने पुष्कळशी जबाबदारी उत्तम तऱ्हेने पार पाडल्याचे समाधान लाभले आहे. त्या सहकारी संस्थानी अविभक्त पंजाबमध्ये चांगलीच प्रगती केली होती. केरळ, सिंध व हैदराबाद दक्षिण या ठिकाणच्या पुनर्वसन कामाचे निमित्ताने मी ठिकठिकाणी फिरत होतो. परंतु फाळणीमुळे ते सारे खटाटोप मातीमोलच ठरले. अहिंसेच्या मार्गाने स्वातंत्र्य मिळाले, आणि राष्ट्राला जवानांचा विसर पडला.

काश्मीर प्रांतातील लोकांच्या पुनर्वसनासाठी भारतीय लष्कराने शेती, कालवे, रस्ते बांधणी, शिक्षण-प्रसार इत्यादि विविध प्रकारे काम केले आहे. त्या कामात भाग घेण्याचे भाग्य १९४९–५२ या तीन वर्षात मला पूर्णपणे लाभले होते. त्यावेळी एक गोष्ट प्रकर्षाने आढळली. ती ही की लष्करी माणूस कोणत्याही क्षेत्रात फार झटकन समावून जातो व निष्णातही बनतो.

आणखी काही वर्षांनी मला बढती मिळून मी यथाक्रमाने कर्नल व ब्रिगेडियर बनलो. आणि त्याच हुद्यावर असताना २८–२–१९५७ साली सैनिकाची वस्त्रे मी उतरविली व परत श्री. निजानंद बाळ (ब्रिगेडियर-निवृत्त) बनलो.

भारतीय लष्कराचे दृष्टीने १९४० ते ४७, व ५० ते ५५ हे दोन क्रांतिकारक टप्पे होते. त्यावेळी सर्व भल्याबुऱ्या आपत्तींना तोंड देण्यात आपले लष्कर पूर्णपणे यशस्वी झाले, असे म्हणणे रास्तच ठरेल.

शिस्त, कोणत्याही समस्येचे खरे स्वरूप आकलन करून चटकन निर्णय घेणे, वक्तशीरपणा, टापटीप, वडिलधाऱ्यांचा योग्य तो मान राखणे, सांघिक वृत्तीने जीवन जगणे या गुणांचा वारसा लष्करी जीवनात लाभल्याने कर्तबगारीचा विकास होतो. आणि हिऱ्याला पडणाऱ्या त्या पैलूने तो अधिक मौल्यवान व दैदिप्यमान बनतो, असेच लष्करी जीवनाविषयी म्हणता येईल.

●●●






(पृष्ठ ८ वरून-बंगाल...)

दुसऱ्यांचे नाही. डॉ. खरे, नरीमन व सुभाष हे वळी महात्माजींच्या अहिंसक हुकुमशाहीचे. तरीही डॉ. खरे व नरीमन यांच्यापेक्षा गांधीजी व सुभाष यांची लढत जास्त चांगली जुंपली. खरे वा नरीमन यांचे पाय खेचण्यास महाराष्ट्रातील रथीमहारथी उत्सुक होते. सुभाषबाबूंच्या मागे सारा बंगाल होता. सारी हिंदी "तरुण" पिढी सुभाषबाबूंच्या पाठीशी होती.

१९४२ सालची "चले जाव" चळवळ " सुभाषबाबूंच्या मागे आपण राहू नये " यासाठी महात्माजींनी सुरू केली. गांधीजींसमोर सुभाषबाबू पराजित होऊनही शेवटी त्यांचाच प्रत्यक्षात विजय दिसू लागला. वैयक्तिक मत्सर फार वाईट. राष्ट्रहिताच्या आड येऊन तो माणसाला आंधळे बनवितो. गांधीजींची अवस्था तशीच झाली. बंगालचा दुष्काळ " मानवनिर्मित" होता. कॉंग्रेसने त्यावर पांघरूण टाकले कारण त्यामागे बरेच मारवाडी व गुर्जर व्यापारी होते. त्या उलट, सुभाषबाबूनी लाखो खंडी वर्मीज् तांदूळ बंगालला देऊ केला. इंग्रजानी तो नाकारला. कॉंग्रसही तेथे स्वस्थ राहिली.

गांधीजीना जे साधले नाही ते सुभाषबाबूनी करवून दाखविले. त्यामागे सावरकरांची प्रेरणा होती. त्यामुळे गांधीजींचा साहजिकच जास्त जळफळाट झाला. ही प्रेरणा घेऊन गांधीजीना जे हिंदु-मुस्लीम ऐक्य साधले नाही ते सुभाषबाबूनी करवून दाखविले. खुद्द नेहरूनीच कबुलीजबाब दिला आहे ' भारताचा शोध' या त्यांच्या पुस्तकात नेहरू म्हणतात:

"The story of the Indian National Army founded in Burma and Malaya during war years spread suddenly throughout the country and evolved an astonishing enthusiasm. The trial by court martial of same of its offices aroused the country as nothing else had done and they became the symbols of India fighting for freedom. They became also the sysmbols of unity among the various religious groups in India, for Hindus and Muslims and Sikhs and Christians were all represented in that army. They had solved the communal problem amongst themselves, so why should we not do so ?"

### आझाद हिंद फौजेचा दणका

या वीरांचे स्वागत गांधीजींच्या कॉंग्रेसने कसे केले ? या वीरांना ' Rice Soldiers ' म्हणून हिणविले गेले. इंग्रजानी ' सुभाषबाबू मेले' अशी अफवा उठविली. सुभाषबाबूंच्या मातेस तार करणाऱ्यात गांधीजी पहिले होते ! अझाद हिंद फौजेच्या सैनिकांचा खटला कॉंग्रेसी नेहरू व भुलाभाई देसाई यानी लढविला. पण कां ? सुभाषबाबूंच्या प्रेमामुळे नव्हे, तर लोकानी त्यांच्या तोंडात शेण घातले असते म्हणून. १९४६ साली लोकाना स्वातंत्र्य अगदी जवळ दिसू लागले. गांधीजी व इतर कॉंग्रेसी पुढाऱ्यांचा प्रचार काय वाटेल ते म्हणो, – परंतु लोकांना ठाऊक झाले होते की इंग्रज साहेबाला शेवटची लाथ सुभाषबाबूंच्या आझाद हिंद फौजेने हाणली होती. त्यानंतर नाविक दलाचे बंड व मुंबईतील असंतोषाचा भडका सर्वप्रसिध्द आहेच. लॉर्ड वॅव्हेल या व्हाईसरॉयची कबुली गांधी व नेहरू भक्तानी लक्षात ठेवण्यासारखी आहे:

"England will not be able hereafter to spare one single man or one single farthing for the governance of India."

गांधीजी श्रेष्ठ असतील. नेहरू असामान्य असतील. पण त्यांची "सूडबुद्धी" जास्तच भडक होती. निदान बंगालला तरी तसे वाटते. सुभाषबाबूंचे नावनिशाण राहू नये यासाठी त्या दोघांनी केवढा खटाटोप केला ! मात्र ' कॉंग्रेसचा इतिहास" या ग्रंथात पट्टाभिसीतारामय्या या गांधीभक्ताने प्रांजळपणे कबूल केले आहे:

" Suffice at for the contemporary would to know that here was a man every inch a 'man' that did not shine by reflected light, that had inner radience that could done and act, for he knew the truth of the great dictum that success comes to those who dare and act. It seldom goes to the timid. This dictum of Jawaharlal's that occurred in his Labour Presidential address was left to be acted upon by Subhas who fashioned his own conduct and career on the high principles embodied in it. Subhas did dare and did act with what measure of success, posterity alone must judge."

स्वातंत्र्याच्या गेल्या दहा वर्षांत कॉंग्रेसने बंगालचे फार हाल केले. सुभाषबाबू जिवंत राहते तर कदाचित् बंगालची फाळणी ते होऊच न देते. आज बंगालचे डोके फिरले आहे. लालभाईंच्या कळपात बंगाल सामील झाला आहे. देशहितविरोधी कृत्ये करण्यात बंगाल मग्न आहे. बंगालमध्ये देशप्रेम व देशभक्ती औषधालाही उरली नाही.

पण हे चित्र खरे नव्हे.

नेहमीच छळ व अपमान सोशीत आलेल्या सावत्र मुलाची स्वावत्र आईविरुद्धची ही Reaction आहे. हा संताप आहे. हा प्रक्षोभ आहे. तो शांत करण्यासाठी प्रक्षोभाचे खरे कारण शोधून काढले पाहिजे.

रोग्याच्या माथी खोट्याच रोगाचे लेबल लावून खोटीच उपाययोजना करण्यात काय अर्थ आहे ?

● ● ●

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment SEPTEMBER 1968

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay-4



अनुक्रमणिका